

सौष्ठव अंक चौदावा

मे - २००४

संपादक

श्रीधर तिळवे

# सौष्ठव

**सौष्ठव**

मे - २००४

•

**संपादक**

श्रीधर तिळवे

१६, तपोवन, ५३-सी विंग एन एन पी-२, मालाड (पूर्व) मुंबई

•

**या अंकाचे देणगी मूल्य : २०/- रुपये**

(खाजगी वितरणासाठी)

•

*या अंकातील रेखाटने दिनकर मनवर यांची असून त्यांचा जन्म १९६७ साली झाला. त्यांनी मराठवाडा विद्यापीठातून पदव्युत्तर शिक्षण घेतले आहे. सध्या ते हिंगोली येथे उपप्रादेशिक परिवहन अधिकारी (वर्ग -१) या पदावर कार्यरत असून 'शब्दवेध' या अनियतकालिकाच्या संपादक मंडळात आहेत. गेल्या दशकभरापासून मराठीतील वाङ्मयीन नियत-अनियतकालिकांतून त्यांच्या कविता व रेखाटने सातत्याने प्रकाशित होत आहेत. नव्या पिढीतील कवी व चित्रकार म्हणून त्यांची ओळख आहे.*

# सौष्ठव



**सहभाग**

हेमंत दिवटे, नितिन रिंढे
मंगेश नारायणराव काळे, श्रीधर तिळवे

## संपादकीय

It's good to be good but it's better to be right

मराठीत शब्दवेध व अभिधा नंतर ही दोन अनियतकालीके असताना 'सौष्ठव' चे पुनरूज्जीवन का ? हा प्रश्न नैसर्गिक आहे. त्याचे साधे उत्तर शब्दवेध हे अद्यापही अस्सल. देशीवादी आहे त्यामुळे त्यांची भूमिका पारंपारिक आहे असे मला वाटते. त्यामुळे शब्दवेधपेक्षा वेगळे अनियतकालिक आम्हाला आवश्यकच वाटते. अभिधानंतर हे आम्ही अभिधाचे संपादक असताना जे धोरण ठरवले होते त्याच धोरणाने हेमंत दिवटे चालवत असतात (मधले काही अंक अपवाद) हे खरे मात्र मराठीसाठी केवळ एक अनियतकालिक पुरेसे आहे असे वाटत नाही. त्यातच अभिधानंतर मधून साठोत्तरीचे होणारे वाजवीपेक्षा अधिक कौतूक, दिलीप चित्र्यांसारख्या कवीच्या विचारांचा वाढत चाललेला प्रभाव बघून अभिधानंतर हे साठोत्तरी साहित्याचे मुखपत्र बनते की काय अशीही शंका आम्हाला आता येते आहे. साठोत्तरी ही एक आऊटडेटेड झालेली पिढी आहे. तीची कडक तपासणी करण्याऐवजी एकविसाव्या शतकातही तिला डोक्यावर घेऊनच आम्ही नाचणार असू तर आपण आपल्या अनियतकालिकांची नावे बदलून 'प्रतिष्ठान' 'अनुष्टुभ' वगैरे ठेवावी हे उत्तम.

खरेतर साठोत्तरीची साहित्य कवितेविषयी मूळ भूमिकाच भंपक आहे आणि ह्या भंपकपणाला निधड्या छातीने उघड करून दाखवणारे नियतकालिक म्हणूनच सौष्ठवचा जन्म अकरा वर्षापूर्वी झाला होता आणि आताही त्याची गरज आहे म्हणून आम्ही ते काढत आहोत. सध्या भारतातले व साहित्य अकादमीचे पुरस्कार, इंग्रजीत साहित्य पोहचवण्याची ताकद, अनेक महाराष्ट्रातले तथाकथित पुरस्कार हे साठोत्तरीच्या हातात सरकले आहेत त्यामुळे अनेक जणांनी साठोत्तरीचे लांगूल चालन सुरु केले आहे. आम्ही हे सगळे पुरस्कार व सत्तास्थाने फाट्यावर मारण्याची तयारी ठेवूनच सौष्ठव चालू केले होते. आजही आमची ही तयारी आहेच. दुर्दैवाने आजही साठोत्तरीचा पंचनामा करणारे लेखन फारसे कुणी करत नाही त्यामुळे आजही आम्हांला 'साठ' ही बॉर्डर ठेवावी लागते. साठोत्तरी ही नव्या लेखकांच्या पायातील मोठा धोंडा बनून गेलीये आणि आम्ही प्रचंड बोंब ठोकूनही हा धोंडा फेकण्याची कुणाची तयारी नाही उलट आम्हाला 'तू सौम्य हो' किंवा तू आत्मकेन्द्रीत आहेस तो आत्मकेन्द्रीतपणा सोड असा जेन्युईन सल्ला देणारे लोक वाढताहेत. जर साठोत्तरीच्या पुढची नसली तर निदान साठोत्तरीचा विकास घडवेल अशी लेखनसामुग्री आम्हाला हवी आहे. अर्थात आमचा प्रिफरन्स हा नव्या जाणीवांना आधिकाधिक आहे. ह्याही अंकात साठोत्तरीचा विकास करणारी मंगेश काळे ह्यांची कविता आम्ही दिली आहेच.

खरेतर कुठलीही नवता परंपरेच्या खांद्यावर उभी असते. पण कुठलीही परंपरा ही स्वभावत: इतकी कर्मठ होत जाते की ती कुणालाच स्वत:च्या खांद्यावर उभी राहू देत नाही. शेवटी नवतेला तिचे डोके कापूनच तिच्या खांद्यावर उभे रहावे लागते हेही तितकेच परखड सत्य आहे.

•••

मराठीत सध्या चिकित्सा करण्याला वाईट दिवस आलेत. प्रश्न विचारणाऱ्यांना 'भांडकुदळ' ठरवण्याचे आणि त्यांना विचारलेले प्रश्न चर्चेबाहेर ठेवण्याचे कौशल्य सध्या अनेकांना अवगत झाले आहे. पुस्तकाच्या परीक्षणापासून पुस्तकाच्या पुरस्कारापर्यंत संमेलनाच्या अध्यक्षपदापासून संमेलनाच्या अध्यक्षांनी काय बोलावे ह्यापर्यंत सर्व काही मॅनेज केले जाऊ शकते आता फक्त प्रत्यक्ष लेखन मॅनेज करणे बाकी आहे. भविष्यात मोठ्या मोठ्या पुढाऱ्यांनी स्वत:च्या नावाने अशी पुस्तके छापून आणली तर आश्चर्य वाटावयास नको. फिल्म इंडस्ट्रीत दीड दोन लाख देऊन अनेक दिग्दर्शक असे लेखन मॅनेज करण्याचा प्रयत्न करत आहेत आणि हल्ली काही लेखक त्याला बळी पडतानाही आम्ही पाहतो आहोत आता साहित्यातही असे दिवस

सुरू होतात काय ते पहायचे ''फलाना पक्षाच्या फलाना अध्यक्षांचा फलाना कवितासंग्रह फलाना पुरस्कारास पात्र '' ह्या बातम्या वाचायला कशा वाटतात?

•••

दुसरी महत्वाची गोष्ट लेनचे लिखाण आणि भांडारकर संस्थेवरील संभाजी ब्रिगेडचा हल्ला ! आम्ही दोघांनाही खणखणीत आणि स्पष्ट शब्दात तीव्र निषेध करतो. आम्ही शरद पवारांचा अतिशय आदर करतो पण पवारांनी ह्या प्रकरणात जी बोटचेपेपणाची भूमिका घेतली ती आम्हाला अजिबात पटलेली नाही. आमचा सर्वात मोठा अपेक्षाभंग रा.ग.जाधव ह्यांनी केला. ते स्पष्ट शब्दात निषेध करतील अशी अपेक्षा होती पण जाधवांनी कारण नसताना मवाळ आणि सौम्य भूमिका घेतली. बहुजन जर हिंदुत्ववाद्यांच्या मार्गाने जाणार असतील तर आपली प्रगती होणे शक्य नाही. ब्राम्हणांनी हया देशात चिकित्सा होणार नाही ह्याची काळजी घेतली आता ब्राम्हणेतरही तेच करणार असतील तर ब्राम्हणांना नावे ठेवण्याचा कसलाही नैतिक अधिकार आपल्याला उरत नाही हे ध्यानात घ्यावे. आम्हाला सर्वात आश्चर्य वाटले ते दि.पु.चित्रे ह्यांचे ह्या प्रकरणात आलेले नाव पाहून. इतरांविषयी आम्हाला फारशी माहिती नाही पण चित्रे हे इथल्या बहुजनांचे कट्टर पाठीराखे आहेत ह्याविषयी आमच्या मनात काडीचीही शंका नाही. त्यांची केवळ जात पाहिली जाणार असेल तर आपणाला आपली लढाई नीट कळलेली नाही असेच म्हणायला हवे. आपली लढाई 'ब्राम्हण्य' विरोधी आहे ब्राम्हणांच्या विरोधात नाही हे आपण जितक्या लवकर समजून घेऊ तितके बरे.

दुसरी गोष्ट जेम्स लेन सारख्या इतिहासकारांनी बाजारगप्पांवर आधारित काही लेखन केले म्हणून हलण्याइतका आपला शिवबा लेचापेचा नाही. शिवाजी महाराज चिकित्सेला खुलेच असले पाहिजे. महाराज हे बावन्नकशी सोने आहे ते कुठल्याही चिकित्सेतून तेजाळूनच बाहेर पडेल. सूर्याला जर कुणी अग्नीपरीक्षा दे म्हणत असेल तर त्याला आपण 'जरुर घे' असेच उघडपणे सांगायला हवे. ते करण्याऐवजी आपलीच संशोधनघरे आपण जाळणार असू तर आपल्यासारखे नादान आपणच आहोत. एक गोष्ट आपण लक्षात घ्यायला हवी आज ना उद्या पण ही सगळी संशोधनघरे शेवटी बहुजन समाजाकडे येणे अटळ आहे. आमची बहुजनसमाजातील पुढाऱ्यांना कळकळीची विनंती की कृपया भावनेचे राजकारण खेळू नका त्यात आपल्या समाजाचे काहीही भले नाही गेली दोन हजार वर्षे आपण बौद्धिक चिकित्सा टाळली आहे आताही आपण तेच करणार असू तर आपण सगळा समाज सांस्कृतिक. आर्थिक, राजकीय दारिद्रयात लोटून देऊ. जो समाज भूतकाळाची परखड चिकित्सा करतो तो भूतकाळाच्या खांद्यावर बसू शकतो आणि त्यामुळे अधिक दूरवरचे पाहू शकतो जो समाज भूतकाळाची परखड चिकित्सा टाळतो त्याच्या मानगूटीवर भूतकाळ भूतासारखा बसतो आणि मग दूरचे जाऊ द्या स्वत:च्या जवळचेही दिसणे कठीण होते.

•••

सौष्ठवचे एक सर्वसाधारण धोरण किमान साठोत्तरी संवेदनशिलतेला पचवून पुढे जाणाऱ्या लेखनाला प्रसिद्धी देणे हे आहे. विशेषत: कथा कादंबरी आणि वैचारिक लेखन ह्यांना ह्यापुढे अधिक जागा देण्याचा मानस आहे. ह्या अंकाला सहकार्य देणाऱ्या सर्व लेखक मित्रांचा मी ऋणी आहे. माझी सर्वच लेखकांना अशी विनंती आहे कि त्यांनी आपले सहकार्य द्यावे व उत्तम लेखन प्रसिद्धीसाठी सौष्ठवला द्यावे. सौष्ठवच्या पुढील अंकात मार्क्सवाद आणि आंबेडकरवाद ह्या विषयावरील लेखन देण्याचा मानस आहे. विश्व सामाजिक मंचासंदर्भातही काही लेखन असल्यास ते जरूर पाठवावे.

– श्रीधर तिळवे



# भाषा, भाष्ये, भाषांतरे आणि संस्कृती

श्रीधर तिळवे

(ह्या लेखात 'भाष्य' हा शब्द मूळ संहितेचे केलेले स्वतंत्र अर्थनिर्णयन ह्या अर्थाने वापरला आहे)

When one man dies, one chapter is not torn out of the book but translated into better language - JOHN DONNE

भाषांतराविषयी काहीही लिहिणे हे भाषांतराइतकेच कठीण असते भाषांतर ह्या शब्दातच 'भाषापालट' सूचीत होतो आणि संहितार्थ मात्र स्थिर ठेवलाय असा अविर्भाव राखला जातो. सर्वसाधारणपणे भाषांतराचा भूतकाळ हा प्राचीन आहे मात्र भाषांतर म्हणजे भाष्य नव्हे ज्ञानेश्वरी ही गीतेचे भाषांतर नसून 'भाष्य' आहे. भारतात भाषांतरे आणि भाष्ये असा दोन्हींचा वारसा आहे.

भारतात चार प्रकारच्या भाषा आहेत.

**१.मार्गी भाषा :**

भारतावर आक्रमकांनी लादलेल्या भाषा किंवा ह्या भाषांचा स्थानिक भाषांशी संकर होऊन तयार झालेल्या भाषांचा समावेश होतो. उदा. संस्कृत मूळ संस्कृत ही आर्य आक्रमकांची भाषा होती पुढे तिचा इथल्या भाषांशी संकर होऊन भारतीय संस्कृत तयार झाली फारशी हीही मुस्लीम आक्रमकांची भाषा तिचा इथल्या भाषेशी संकर होऊन त्यातून हिंदुस्थानी (उर्दू) जन्मली इंग्रजी ही इंग्रज आक्रमकांची भाषा तिचा इथल्या देशी भाषाशी संकर होऊन Inglish (ईंग्लींश) ही इंडियन म्हणावी अशी भाषा आता आकार घेते आहे. भालचंद्र नेमाडेसारख्यांना 'हिंदुस्थानी' ही मार्गी मान्य आहे पण Inglish ईंग्लीश ही मार्गी मात्र मान्य नाही. त्यांच्या ह्या भूमिकेत परस्परविरोध आहे हे ही त्यांना कळत नाही. माणूस परंपरेत अडकून पडला की काय होते ह्याचा हा नमूना. भारतातील आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण मार्गी भाषा म्हणजे बंजारी लोकांची 'गोर' ही भाषा ! तिलाही प्रादेशिक बंधने नाहीयेत. पुढेमागे आदिवासी चळवळीची ती प्रमुख मार्गी भाषा म्हणून Inglish किंवा हिंदुस्थानी किंवा संस्कृत सारखी पसरत गेली तर त्याचे आश्चर्य वाटू नये.

**२.देशी:** ह्यात त्या त्या प्रदेशाशी निगडीत असलेल्या भाषांचा समावेश होतो. उदा. मराठी, गुजराती.

**३.पोटी :** ह्यात भाषेच्या स्थानिक रुपाचा समावेश होतो. उदा.कोकणी, वऱ्हाडी, कोल्हापूरी ह्यासर्व मराठीच्या पोटभाषा आहेत.

**४.जमाती :** ह्यात प्रामुख्याने आदिवासी लोकांच्या वा एखाद्या जातीजमातीच्या भाषांचा समावेश होतो. उदा. वारली, आगरी.

भाषांतरे ही सर्वात जास्त मार्गी भाषात होतात किंबहुना मार्गी होण्याची ती आद्य अट असते. भारतात भाषांतराचे अनेक प्रकार होतात.

**१.मार्गी ते मार्गी :** सलमान रश्दीच्यामिडनाईट चिलड्रसचे प्रियदर्शनकृत हिंदुस्थानी भाषांतर

**२.मार्गी ते देशी :** शेक्सपियरच्या हॅम्लेटचे अरुण नाईक कृत मराठी भाषांतर

**३.मार्गी ते पोटी :** नव्या कराराचे 'नवो करार'हे कोकणी भाषांतर

**४.मार्गी ते जमात :** जवळ जवळ नाहीच

**५.देशी ते देशी :** शिवाजी सावंत ह्यांच्या 'मृत्यूंजय' चे गुजराती भाषांतर

**६.देशी ते मार्गी :** भालचंद्र नेमाडेंच्या 'कोसला'चे इंग्रजी भाषांतर

**७.देशी ते पोटी :** फार कमी (मराठी कवितांची कोकणी भाषांतरे)

**८.देशी ते जमाती :** जवळ जवळ नाहीच (हिंदी फिल्मी गाण्यांची आगरी भाषांतरे)

**९.पोटी ते मार्गी :** फार कमी (लोकधूनांची हिंदी भाषांतरे)

**१०.पोटी ते देशी :** फार कमी जवळ जवळ नाहीच

**११.पोटी ते पोटी :** फार कमी

**१२.पोटी ते जमाती :** जवळ जवळ नाहीच

**१३.जमाती ते मार्गी :** आदिवासी कवितांची भाषांतरे

**१४.जमाती ते देशी :** भुजंग मेश्रामने अशी भाषांतरे 'उलगुलान' मध्ये केलेत (स्वतःच्याच कवितांची)

**१५.जमाती ते पोटी :** माहीत नाही

**१६.जमाती ते जमाती :** माहीत नाही

भाषांच्या प्रकारानुसार भारतातील संस्कृतीचेही १.मार्गी २.देशी ३.पोटी ४.जमाती असे चार प्रकार होतात. त्यातील मार्गी संस्कृती अनेकदा सत्ताधारी शोषकांची व आपमतलबी लोकांची संस्कृती असते असा भारताचा भूतकाळ सांगतो.

भारतात 'संस्कृत' ही 'ब्राम्हणी' मार्गी 'हिंदुस्थानी' ही 'क्षेत्रीय' मार्गी 'गोर' व 'इंग्रजी' ही 'विश' मार्गी भाषा होती असे म्हणता येईल.

भारतात भाष्ये ही जशी भाषांतराला पूरक असतात तशी

अर्वाचिनीकरणेही भाषांतराला जवळची असतात उदा.विन्दा करन्दीकरांनी अनुभवामृताचे केलेले अर्वाचिनीकरण इथे एका अर्थाने भाषेची कालीक मिती भाषांतरीत केलेली असते पण काळ आणि अवकाश वेगळा नसतो हे आईनस्टाईनचे सूत्र मान्य केले तर अर्वाचिनीकरणामुळे भाषेचा अवकाश काही प्रमाणात का होईना भाषांतरीत होतो हे मान्य केले पाहिजे.

शब्दाचा अवकाश हा तीन मितींनी युक्त असतो. (निन्हाळांच)

**१.अभिधा** **२.लक्षणा** **३.व्यंजना**

काळाबरोबर ह्या तीन मितीही बदलतात म्हणूनच अर्वाचिनीकरण करणे म्हणजे अवकाश बदलणे असेही होते. अर्थात अर्वाचिनीकरणात अवकाशाचे पैलू मर्यादित बदलतात. भाष्यात मूळ संहितेचा विस्तार किंवा प्रतिवाद असू शकतो. माझे टीकाहरण हे पुस्तक काही प्रमाणात नेमाडेंचा प्रतिवाद करणारे भाष्य आहे (मूळ संहिता अर्थात टीकास्वयंवर आहे) ते समभाषी भाष्य आहे ज्ञानेश्वरी हे संस्कृत संहिता गीता मूळ असल्याने मार्गीभाषी भाष्य आहे. ह्या सगळ्या भानगडीतून आपणाला संस्कृतीतही काही विलक्षण प्रक्रिया दिसतात.

**१.मार्गीकरण :** जेव्हा इतर 'मार्गी' 'देशी', 'पोटी' किंवा जमाती गोष्टीला मार्गी स्विकारते.

**२.देशीकरण :** जेव्हा 'मार्गी', 'इतर देशी', 'पोटी' किंवा 'जमाती' गोष्टीला देशी स्विकारते.

**३.पोटीकरण :** जेव्हा 'मार्गी', 'देशी', इतर 'पोटी' किंवा 'जमाती' गोष्टीला पोटी स्विकारते.

**४.जमातीकरण :** जेव्हा 'मार्गी', 'देशी', 'पोटी' किंवा इतर 'जमाती' गोष्टीला जमाती स्विकारते.

**५.अर्वाचिनीकरण :** जेव्हा स्वत:तील संस्कृतीतील गोष्टीला नवे रूप दिले जाते.

संस्कृतीच्या वाढीसाठी ह्या सगळ्याच प्रक्रियांची आवश्यकता असते. ह्या क्रियातून काही उपप्रक्रिया जन्मताना दिसतात म्हणजे आजच्या भारतीय समाजाकडे आपण लक्ष्य टाकले तर खालील उपप्रक्रिया सहज आढळतील.

**ब्राम्हणीकरण :**

शहाबानो प्रकरण हे भारतीय समाजाला वळण देणारे प्रकरण ! हे मुस्लीम समाजाच्या ब्राम्हण्यातून जन्मले अरबी ह्या परभाषी मार्गी भाषेतील 'कुराण' ही संहिता प्रमाण मानून ह्या समाजाने आणि कॉंग्रेसने ह्या प्रकरणात संसदेत 'ब्राम्हण्य' (शरीयतचे) पाळणारा कायदा पास करून घेतला इथे परभाषी मार्गी इस्लामी संस्कृतीचे प्रभुत्व प्रस्थापित झाले पण ह्याला प्रतिक्रिया म्हणून हिंदू समाजानेही स्वत:चे ब्राम्हणीकरण घडवून आणून 'रामायण' ह्या स्वभाषी मार्गी भाषेतील संहिता प्रमाण मानून राममंदीर आंदोलनाला पाठिंबा देत स्वभाषी ब्राम्हण मार्गी संस्कृतीचे सर्वस्व स्वत:वर लादून घेतले. ह्या दोन्ही घटनात 'मार्गीकरण' हे ठळक होते आणि त्याने ब्राम्हणीकरणाला चालना दिली आज संपूर्ण भारतीय समाज स्वत:चे ब्राम्हणीकरण घडवून आणतो आहे.

**क्षेविकरण (क्षेत्रियविशीकरण) :**

पारंपारिक जातिव्यवस्थेत सत्ता मिळवणे आणि व्यापार करणे हे क्षत्रिय आणि वैश्यांचेच काम आहे अशी मर्यादा मार्गी (मनुस्मृति) संहितांनी आखून दिली होती. १९८० नंतर प्रचंड प्रमाणात ही मर्यादा सर्वच जाती जमातींनी तोडून स्वत:तून सत्ताधारी आणि व्यापारी जन्माला घातले ह्यातूनच समाजाचे क्षेविकरण झपाट्याने घडत आहे. विशेषत: परिघाबाहेरचे शूद्र, अतिशूद्र आणि आदिवासी हे क्षेविकरण झपाट्याने स्विकारताना दिसतात त्यातूनच कुणबी शूद्र स्वत:ला क्षत्रिय म्हणवून घेतात किंवा काही तेल्यांनी स्वत:ला वैश्य घोषित करायला सुरुवात केली आहे. स्वामी विवेकानंदांच्या मते गुजरातमध्ये इंग्रजाच्या आगमनानंतर ज्या ब्राम्हणांनी वाणिज्यता स्विकारली आणि ज्यांनी नाकारली त्याला धरून दोन भाग झाले पुरोहितांचा व्यवसाय करणारी ब्राम्हण (त्यांना नागर ब्राम्हण म्हणतात) तर वाणिज्य व्यवसाय चालू केला त्यांना फक्त 'नागर' म्हणण्यात येऊ लागले म्हणजे वैश्यवृत्ती धारण करणाऱ्या ब्राम्हणांनाही 'ब्राम्हण' शब्दाचा त्याग करावा लागला (पहा स्वामी विवेकानंद ग्रंथावली - भाग दहा पान क्र.२०० नववी आवृत्ती)

**शूद्रीकरण :**

एकेकाळी शूद्रांचे मानले गेलेले काही धंदे वा कार्ये ही प्रचंड पैसा व किर्ती मिळवून देणारी ठरल्याने काही तथाकथित उच्चभ्रू जातींनी हे शूद्रांचे धंदे स्विकारायला सुरुवात केली आहे. उदा. नाचगाणे हल्ली राजकपूर पासून ते माधुरी दीक्षितपर्यंत अनेक ब्राम्हणांनी स्वत:च कधीकाळी बदनाम झालेले हे क्षेत्र निवडून शूद्रीकरणाला चालना दिली. अर्थात ह्या लोकांनी शूद्र अतिशूद्र आदिवासींचे शारीरिक कष्टाचे व प्रतिष्ठा नसलेले धंदे सोयिस्कररित्या टाळले आहेत.

**नवमध्यमवर्गीकरण :**

१९८५ नंतर भारतीय समाजाच्या ब्राम्हणी आयामात ब्राम्हणीकरण क्षेत्रिय आयामात क्षेविकरण शूद्रीकरण घडले तसेच विश आयामात नवमध्यमवर्गीकरण घडून आले नव्याने निर्माण झालेला आणि जवळ जवळ संख्येने तब्बल वीस ते पंचवीस कोटी झालेला हा नवा मध्यम वर्ग मार्गीकरणाच्या सर्वच प्रक्रिया झपाट्याने

आत्मसात करतो आहे जागतिकीकरण हे मार्गीला पूरक असल्याने त्याना मनोभावे स्विकार ह्या वर्गाने केलेला आहे. त्यातील मूळच्या मध्यमवर्गापेक्षा जो वाटलेला नवा मध्यमवर्ग आहे (जो ब्राम्हणेत्तर समाजातून आला) हा अधिकच कडवा असल्याने त्याने नवा उपभोग आत्मसात करण्यासाठी फारसा वेळ लावलेला नाही. भारतीय समाजात हे जे वर्गांतर घडले ते अनेक परिणाम घडवून आणणारे आहे. भारतात वर्णांतर आणि जात्योंत्तर हे फार कचितच घडते (वर्णच्युती (ज्ञानेश्वर) व जातच्युति घडल्याशिवाय ते साधारण होत नाही कचित शिवाजी सारख्या शूद्रानी क्षत्रिय अशी वर्णोन्नती व जातोन्नती घडलेली दिसते) पण वर्गांतर मात्र नेहमीच घडत असते. मागील शतक त्याला अपवाद नव्हते. भारतात इ.स.१००० नंतर ब्राम्हण वर्णाने सर्वच ब्राम्हणेतरांना वर्णच्युत करुन वर्णच्युती घडवली व शूद्राचा दर्जा दिला पुढे १८५० पासून पुन्हा वर्णोन्नती व जातीन्नती घडवून वा घडून क्षत्रिय व वैश्यांनी आपला तथाकथित उच्च मार्गी दर्जा पुन्हा हासिल केला त्यामध्ये ह्या मध्यम-वर्गीकरणाचा, नवमध्यमवर्गीकरणाचा अतिशय महत्वाचा वाटा आहे.

**चिन्हवस्तूकरण :**

१९८५ नंतर टी.व्ही., संगणक, प्लेयर्स, कॅसेटस, वॉशिंग मशीन्स अशा प्रोग्राम असलेल्या अनेक चिन्हवस्तू (सेमिओडीटीज) प्रचंड प्रमाणात आल्या आणि त्यांनी संपूर्ण समाजच बदलला. ह्या चिन्हवस्तू प्रामुख्याने इंग्रजी, हिंदुस्थानी, संकरीत, ईग्लिंश ह्या तीन मार्गी भाषात प्रोग्रामत असल्याने संपूर्ण समाजाचे एक नवे मार्गीकरण घडून येताना दिसते आहे. नवइंग्रजीकरण व हिंदुस्तानीकरण (प्रामुख्याने उर्दूचा प्रभाव असलेली हिंदी) असे नवे भाषीक मार्गीकरण झपाट्याने घडते आहे ह्यामुळे भारतीय समाजात सरळ सरळ द्विध्रुवीकरण निर्माण झाले आहे. १.मार्गी ध्रूव २.अमार्गी ध्रूव (ह्यात देशी, पोटी, जमातींचा समावेश होतो.) ह्या दोन्हीतला ताणावाणा हा एकविसाव्या (२१) शतकाचा खास चिंतनाचा व चिंतेचा विषय राहणार ह्यात शंका नाही. कम्युनिस्ट, गांधीवादी, समाजवादी, आंबेडकरवादी ह्या सर्वानाच अमार्गी ध्रूवाखाली संघटीत व्हावे लागेल अन्यथा ते नामशेष होतील असे आता स्पष्ट दिसत आहे. दुर्दैवाने ह्या लोकांना हे न कळल्याने अजूनही हे विभागलेले आहेत.

भाषांतराचा समस्या आणि संस्कृतीसंपर्काच्या समस्या ह्या समानस्वभावी असल्याने त्या सोडवताना दोघांनाही एकमेकाचा फायदा होऊ शकतो किंबहुना एका व्यापक अर्थाने भाषांतर हा संस्कृतीसंपर्कच असतो. भाषांतर हे चिन्हांतराचा भाग असते, पण भाषांतर झाल्याशिवाय चिन्हांतर झाले असे वाटत नाही. उदा. संस्कृत वा हिंदुस्थानी जाऊन इंग्रजी संस्कृतीचे मुख्य मार्गी होणे ही चिन्हांतराची एक व्यापक मोहीम होती आणि ती इंग्रजी भाषा मुख्य मार्गी भाषा झाल्यानंतरच लक्ष्यात आली. ह्याबाबतीतले सर्वात नमूनेदार मार्गीकरण जर कुठले असेल तर ते गोव्याचे आहे. वास्तविक गोव्यात राज्य केले ते पोर्तुगीजांनी आणि त्यांनी लादलेली भाषा पोर्तुगीजी होती पण गोवा स्वतंत्र झाल्यानंतर अवघ्या दहा वर्षात तिथून पोर्तुगीज नाहिशी झाली खरेतर त्यावेळी तिथे मराठी वा कोंकणी ह्या अमार्गी भाषा यायला हव्या होत्या पण तसे न घडता इंग्रजीचा प्रवेश होऊन अवघ्या वीस वर्षात तिथे इंग्रजी ही मार्गी झाली आणि मार्गी लागली मराठी ही 'देशी' तिथे 'मार्गी' होण्याची शक्यता होती पण तिला फेकून देऊन गोव्यातील खिश्चनांनी पद्धतशीरपणे इंग्रजी ही मार्गीत आणि कोंकणी ही 'पोटी' देशी भाषेत रुपांतरीत करुन घेतली त्यासाठी मराठी विरोधी आंदोलनही उभे केले जे लोक कधी पोर्तुगीजांच्या विरुद्ध लढले नाहीत ते ज्यांनी त्यांना स्वातंत्र्य मिळवून दिले त्या मराठी भाषिकांविरुद्ध मात्र लढायला उभे ठाकले हे जगाच्या भूतकाळातील असे एकमेव उदाहरण असेल. ह्याला वसाहतवादाचा नेमका कसला परिणाम म्हणायचा की इथल्या लोकांची वृत्तीच परधार्जिणी आहे असं म्हणायचं हा एक मोठा प्रश्न आहे. आपण एकतर एकदम ग्लोबल कसे होतो किंवा पोटी जमातीय कूपमंडूक कसे होतो त्याचे हे उत्तम उदाहरण आहे. जगात सर्वत्र ज्यांनी ज्यांनी त्या भागाला स्वातंत्र्य मिळवून दिले त्यांना त्यांना तेथील जनतेने निवडून दिले गोवा हे एकमेव राज्य असे आहे जिथे स्वातंत्र्य मिळवून देणारे पराभूत झाले आणि स्वातंत्र्याशी थेट संबंधित नसणारा भाऊसाहेब बांदोडकरासारखा उद्योगपती मुख्यमंत्री झाला आणि त्यांचा महाराष्ट्रवादी गोमंतक पक्ष सत्ताधारी झाला तेथील जनतेने मराठी महाराष्ट्र राज्यात विलीन व्हायला नकार दिला मात्र महाराष्ट्रवादी गोमंतक पक्षाला मात्र निवडून दिले. भारतातील भाषिक वास्तव किती गुंतागुंतीचे असू शकते त्याचा 'गोवा' हे एक उत्तम नमुना आहे. गोव्यातील खिश्चन चिन्ह प्रणालीला मराठी ह्या देशी भाषेपेक्षा इंग्रजी ही मार्गी भाषाच अधिक जवळची वाटली आणि त्यामुळेच तिने इंग्रजीचा स्विकार केला हे तिथल्या चिन्हांतराचे वैशिष्ट्य आहे. इंग्रजी भाषा 'मार्गी' होण्यासाठी त्या प्रदेशात इंग्रजाचे राज्य असणे वा ती त्यांची वसाहत असणे गरजेचे असते हे गृहीतक गोव्यात साफ कोलमडून पडलेले दिसते पाँडेचरीत फ्रेंच जाऊन इंग्रजी आली आणि तिथेही हेच घडले असणार असा माझा अंदाज आहे. मग गोव्यात इंग्रजी नेली कुणी तर त्याचे उत्तर

'हिंदुस्थानातल्या मार्गी संस्कृतीने' हेच आहे लोक क्षेत्रीय आयाम आणि चिन्हीय आयाम कसे वेगवेगळे काढतात त्याचा गोवा हा नमुना आहे.

भारतीय भाषांचा विचार करताना एक गोष्ट तीव्रतेने जाणवते ती म्हणजे संस्कृत आणि हिंदुस्तानी ह्या दोन्ही मार्गी भाषा 'उत्तरी' आहेत. तर इंग्रजी ही 'पूर्वपश्चिमी' आहे (कलकत्ता व मुंबई ही दोन्ही केन्द्रे राजकीय राजधानी व आर्थिक राजधानी म्हणून त्यामुळेच उदयाला आली) जिला दाक्षिणात्य मार्गी म्हणावी अशी एकही मार्गी जन्मलेली नाही (दखनी ही दाक्षिणात्य मार्गी म्हणावी इतकी विकसीत झाली नाही) ह्याचा परिणाम म्हणून इसवी सन १००० पर्यंत जो महाराष्ट्र (विशेषत: कोल्हापूर सातारा) दाक्षिणात्य होता तो हळूहळू हिंदुस्थानी आणि नंतर इंग्रजी ह्या मार्गींना शरण जाऊन उत्तरेकडे झुकत गेला त्याची दक्षिणेशी नाळ तुटली आणि महाराष्ट्राच्या देशीपणाला व देशीकरणाला हे नाळ तुटणे प्रचंड महागात पडले आहे. (उ.कर्नाटकात फिरताना आम्हाला कधीही परके वाटत नसे आता मात्र थोडासा परकेपणा झिरपत चालला आहे.) महाराष्ट्राला त्याच्या उत्तरीकरणाचे काय फायदे झाले आणि काय तोटे झाले हे एकदा खोलात जाऊन तपासायला हवे. महाराष्ट्रात दक्षिणेकडची भक्ती प्रचंड फोफावली आणि उत्तरेत ती महाराष्ट्रानेच फोफावत न्हेली (विशेषत: नामदेव) पण उत्तरेत दक्षिण न्हेता न्हेता महाराष्ट्र स्वत:चीच दाक्षिणात्य ओळख हरवून बसला त्याला एक मोठे कारण दाक्षिणेस मार्गीचा अभाव होता. उत्तरेकडची संस्कृती ही नेहमीच आक्रमकांच्या प्रभावाखाली नांदत असते त्यामुळेच उत्तरेवर आजही आर्य आणि मुस्लीम संस्कृतीचा प्रभाव प्रचंड असतो जिला हिंदू अस्मिता म्हणावी तिचा फार कमी प्रभाव उत्तरेत आहे. हिंदुत्ववादाच्या नावाखाली शहाबानो प्रकरणाच्या निमित्ताने तिथे आर्य आणि मुस्लीम संस्कृती एकमेकाला पुन्हा टक्करल्या आणि भारतीय समाजाचे पुन्हा विघटन झाले. उत्तरेवर इंग्रजी ह्या मार्गीचा प्रभाव मात्र क्षीणच होता त्यामुळे आधुनिकतेचा तिथला वेग फार क्षीण आहे आज बिहारचे तिथे जे काय झाले आहे त्याला इंग्रजी ह्या मार्गीचा पुरेसा प्रभाव नाही त्यामुळे झाले आहे. निव्वळ देशीयतेने काय होते त्याचा बिहार हा नमुना आहे.

दक्षिणेकडे मार्गी नसल्याने दक्षिणेने इंग्रजी ह्या मार्गीचा मन:पूर्वक स्विकार केला आणि आज दक्षिणेकडचा विकास हा प्रचंड होताना दिसतो आहे. देशी आणि मार्गी ह्यांची जी अभूतपूर्व सांगड दक्षिणेने घातली त्यामुळे त्यांचे जे जे देशी चांगले आहे ते टिकलेच पण इंग्रजी मार्गीयतेचा स्विकार केल्याने त्यांची वाढही झपाट्याने होत गेली. महाराष्ट्रात देशीयता नीट फोफावली नाहीच. इंग्रजी व हिंदी ह्या दोन्ही मार्गींनी तिची अक्षरश: कत्तल चालवली आहे. अतिरेकी देशीवादामुळे बिहारचा सत्यानाश झाला तर अतिरेकी मार्गीयतेमुळे महाराष्ट्राचा नाही तरी मराठीचा सत्यानाश होण्याची वेळ निश्चित आली आहे. पंजाबी, मराठी, गुजराती हे अतिरेकी मार्गियतेचे बळी आहेत. बंगालीने इंग्रजी ह्या मार्गीचा स्विकार करूनही स्वत:ची देशीयता नीट जपली. पंजाबी, गुजराती आणि मराठी ह्यांना हे जमले नाही. ह्याची कारणमीमांसा करायला गेलो तर बंगालीची अवस्था ही दाक्षिणात्य प्रदेशासारखी होती हेच कारण दिसते तिथे हिंदुस्थानी ह्या मार्गीचा प्रभाव अतिशय क्षीण होता हा प्रभाव इतका क्षीण होता की बांगला देशाने सक्ती होताच हिंदुस्थानी ह्या मार्गीला नकार देऊन स्वतंत्र बांगला भाषी राष्ट्र निर्माण केले. गोव्यातही दाक्षिणात्य मार्गी नसल्याने आणि उत्तरी मार्गीचा (संस्कृत व हिंदुस्तानी) गोव्यावरील प्रभाव क्षीण असल्याने इंग्रजी ह्या मार्गीचा स्विकार सहज केला आणि स्वत:ची प्रगती केली. ज्या मराठीला महाराष्ट्रात स्वत:ची साधी देशीयता टिकवता आली नव्हती तिने गोव्यात मार्गी होण्याचे स्वप्न बघणे हे जरा ज्यादाच होते. त्यामुळे पोर्तुगीजीला पर्याय म्हणून मराठी नव्हे तर इंग्रजी आली आणि पोटी भाषेला कोकणीला गोवेकरांनी देशी भाषा म्हणून दर्जा देऊन तिला उन्नत करण्याचे स्वप्न पाहिले. गोव्यातील मुशेगात संस्कृतीचा ज्यांना अनुभव आहे त्यांना हे करणे किती कठीण आहे ह्याची कल्पना असेलच. गोव्याने मराठीचा स्विकार मार्गी म्हणून नाही तर निदान देशी भाषा म्हणून करावा अशी तिथल्या मराठी भाषकांची अपेक्षा आहे पण त्यामुळे गोव्यातील लोकांना काय फायदा हा प्रश्न उपस्थित होतो. देशी रचनेत एक प्रमाण देशी भाषा आणि तिच्या आसपास अनेक पोटी भाषा नांदाव्या लागतात गोव्यात अशा प्रमाण मराठी भाषेची गरज अनेकांना वाटत नाही त्यामुळे इंग्रजी ही मार्गी व कोकणी ही देशी असे काहीसे दाक्षिणात्य राज्यांना जवळ जाणारे धोरण गोव्याने स्विकारले आहे आणि ते बरेच आहे. गोवा हा कधीच पश्चिमी वा उत्तरी नव्हता तो दाक्षिणात्यच होता आणि गोव्याने आपले हे दाक्षिणात्य वळण अजिबात सोडू नये असे माझे मत आहे. महाराष्ट्राने ह्याबाबत जी स्वत:ची आत्मवंचना केली ती महाराष्ट्रालाच लखलाभ होवो गोव्याने आपली आत्मवंचना करून घेऊ नये असे माझे स्पष्ट मत आहे. उत्तरीकरणाचे फायदे कमी आणि तोटेच जास्त आहेत हे निदान महाराष्ट्र व गुजरातवरून तरी स्पष्ट व्हावे. गोव्याला पश्चिमी करण्याचा घाट उत्तरीकरण घालणारच पण गोव्याने ह्याला दाद देऊ नये.

आता एक प्रश्न असा निर्माण होतो की हिंदुस्तानीमुळे

संस्कृतमुळे त्यांच्या मार्गीयतेमुळे एक उत्तर संस्कृती जन्मली दक्षिणात्यांनी देशीयतेच्या जीवावर खास दक्षिणी संस्कृती जन्माला घातली तर पूर्वेला बंगालीच्या जीवावर पूर्वी संस्कृती उदयाला आली. तशी महाराष्ट्र व गुजरातला जिला पश्चिमी म्हणता येईल अशी संस्कृती का जन्माला घालता आली नाही ? की इंग्रजी ही मार्गी स्विकारुन स्वत:च्या देशीयतेचा अंत घडवून आणून वा मृत्यू पत्करुन हे प्रदेश उत्तरेप्रमाणे एक नवी Inglish (ईंग्लीश) मार्गी संस्कृती जन्माला घालत आहेत ? मला स्वत:ला ही शक्यता प्रचंड प्रमाणात दिसते आहे. ह्या संस्कृतीमुळे मराठी आणि गुजराती ह्या भाषांचा मृत्यू झाला तर....तर....तर....

दिलीप चित्रे ह्यांना तुकाराम ज्ञानदेव भाषांतरीत करण्याची लागलेली मरणघाई ही शक्यता सुचवते का ? ह्या प्रदेशात देशीयतेची मृत्यू घण्टा वाजत असल्यानेच नेमाडेंना व गणेश देवींना देशीयतेची चळवळ उभी करण्याची प्रथम निकड भासते आहे का? ही Inglish संस्कृती आख्खा हिंदुस्तान नंतर गिळेल का ?

भारतातील भाषीक गुंतागुंती किती गाढदार आहेत आणि इथल्या संस्कृतीशी त्यांचा किती खोलवर संबंध आहे हे कळायला वरील विवेचन केले. भाषांतर करताना आपण नेमके कशासाठी भाषांतर करतो हा प्रश्न विचारतांना आणि त्याचे उत्तर शोधतांना वरील भाषीक गुंतागुंत नीट समजून घेणे आवश्यक आहे.

•••

भाषांतराबाबत समाजात दोन दृष्टीकोन असतात

**१.आयाती दृष्टीकोन :**

एखादी परभाषीकृती आंपल्या भाषेत आपण भाषांतरीत करुन ती आपल्या भाषेत आयात करणे ह्याला आयाती दृष्टीकोन म्हणतात.

**२.निर्याती दृष्टीकोन :**

एखादी स्वभाषीकृती दुसऱ्या भाषेत भाषांतरीत करून तीला दुसऱ्या भाषेत निर्यात करणे ह्याला निर्याती दृष्टीकोन म्हणतात.

काही लोकांचा आयातीला विरोध असतो आयात करून आपणाला काय फायदा असा त्यांचा सवाल असतो पण हे मोजके लोक असतात काही लोकांचा निर्यातीला विरोध असतो जर समोरच्या लोकांना तुमची कृती आयात करणे गरजेचे वाटले तर ते स्वत:च ती आयात करतील तुम्ही स्वत:हून त्यांना ती निर्यात का करता असा त्यांचा स्वाभिमानी सवाल असतो. विशेषत: आपले लोक निर्लज्जासारखे त्या लोकांना काडीचाही रस नसताना निर्यात करतात तुमच्या त्या निर्यातीला कुणी हींग लावून विचारत नसताना तुम्ही कशाला निर्यात करता असा त्यांचा सवाल असतो. विशेषत: वसाहतीतले लोक देशी कलाकृती स्वत:च मार्गी भाषेत भाषांतरित करतात तेव्हा हा प्रश्न तीव्र बनतो. मार्गीतले लोक स्वत: त्यांना गरज वाटेल तर तुमच्या कलाकृती मार्गी भाषेत आयात करतील असे त्यांचे प्रतिपादन असते. ते आपल्या संहिता आयात करणार नाहीत आपण मात्र त्यांच्या संहिता आयात करायच्या आणि आपणच त्यांना आपल्या संहिता निर्यात करायच्या म्हणजे आपणच आयात करायची आणि आपणच निर्यात करायची हे संस्कृतीचा समतोल घालवणारे ठरते असे त्यांना वाटते. ज्यांना 'इज्जत' ही सर्वोत्तम गोष्ट वाटते त्यांच्यासाठी हा विरोध योग्यच आहे पण ज्यांना ह्यातली गुंतागुंत कळतीये त्यांना असा स्वाभिमान परवडणारा नसतो. काहीवेळा काही भाषांतरकर्ते केवळ दलाल असतात. इकडचा माल तिकडे तिकडचा माल इकडे आणणे एवढाच त्यांचा व्यवसाय असतो. त्यांना स्वाभिमानाचे प्रश्नच पडत नाहीत. विशेषत: इंग्रजीत लिहिणाऱ्या आणि मूळ देशीत ही लिहिणाऱ्या द्विभाषीक कवींना स्वाभिमानाचे प्रश्न फारसे सतावत नसतात. अनेकदा देशी भाषेची संपत्ती मार्गी भाषिकांना दाखवणे एवढाच प्रदर्शनीय हेतू असतो. ह्या प्रदर्शनीय हेतूमुळे अनेकदा अत्यंत सामान्य आणि हीन दर्जाची संहिताही भाषांतरीत केली जाते. मराठी बाबत तर अशी हिमालयन ब्लंडर्स भल्या भल्या लोकांच्या हातातून घडलेली आहेत ह्यांची अक्कल कुठे म्हैस चारायला गेली होती की काय असं वाटण्याइतपत अत्यंत उथळ अशी संहिता भाषांतरीत झाली आहे उदा.हेमंत जोगळेकर यांच्या 'होड्या'चा अनुवाद मकरंद परांजपे सारख्या दिग्गजाने केला आहे. नेटीवीझमची सीरीयस चर्चा करणारा हा गृहस्थ मराठीतील मध्यम दर्जाची कविता अनुवादीत करताना पाहून आपण थक्क होतो आम्ही ह्याला हिमालयन ब्लंडर म्हणतो. आता मराठीतील नामचीन आणि उत्तम कवी सोडून ह्या माणसाला हेमंत जोगळेकर का अनुवाद करावासा वाटला ? ही कविता वाईट नाही पण इग्रंजी वाचकाला आवर्जून दाखवावी. अशी श्रीमंती तिच्यात नाही. ही कविता वाचून इंग्रजी वाचकाला मराठीत ज्ञानेश्वर, तुकाराम, अरुण कोलटकर, नामदेव ढसाळ सारखे कवी होऊन गेले आहेत ह्यावर विश्वास ठेवणेच कठीण जाईल. आणि मराठीविषयी त्याचे निष्कारण गैरसमज होण्याची शक्यताच जास्त म्हणजे मराठीची श्रीमंती दाखवणे हा हेतू साध्य तर होणार नाहीच पण ह्या कवितेतील दारिद्रय पाहून जे खरोखर श्रीमंत कवी आहे त्यांच्याकडे तो पाठ फिरविण्याचीच शक्यता जास्त. मराठीतील नेमकी सामान्य दर्जाचीच पुस्तके का अनुवादीत होतात आणि मध्यम दर्जाचे लोकच ज्ञानपीठ का मिळवतात ह्या प्रश्नाचे उत्तर आपण हेच लोक पोहचवतो हे आहे. दुर्दैवाची गोष्ट

अशी की दिग्गज आणि तज्ञ समजणारे लोकच अशी चूक अनेकदा करतात आणि ती दुरुस्त करणे ते पुस्तक मार्केटमध्ये आल्याने कुवतीबाहेर जाते. निर्यात करणारा माणूस जर माल खपणारा आहे की नाही ह्याविषयी फारसा काळजी करणारा नसेल किंवा माल खपवण्याऐवजी केवळ मालाची किर्ती होण्यात त्याला रस असेल आणि त्या किर्तीच्या अनुषंगाने मिळणाऱ्या दुय्यम दर्जाच्या फायद्यावर (म्हणजे उदाहरणार्थ इंग्रजीत अनुवादीत झाल्याने त्या कवीचा देशी भाषेत उगाचच भाव वाढतो इंग्रजीत गेला म्हणजे थोरच असणार अशी भावना बाळगणारे खूप लोक देशी भाषेत असतात) तो खूप असेल तर त्याला मालाच्या दर्जाची चिंता करण्याचे काहीच कारण नसते परिणामी अत्यंत दुय्यम दर्जाची निर्यात शक्य होते किंबहूना अनेक हौशी मॅनेजर पैश्याच्या जीवावर असा माल तयार करुन (म्हणजे स्वत:च छापून किंवा छापवून) अशी निर्यात करत असतात. ह्या सगळ्यात कुणाचे काय नुकसान होते ह्याचा अंदाज करणे कठीण असते. हौशी, मिरवणाऱ्या, प्रसिद्धीसाठी हपापलेल्या व मान्यतेसाठी कोणत्याही थराला जाण्याची तयारी असलेल्या ह्या वृत्तीमुळे निर्याती दृष्टिकोन नेहमीच संशयाच्या भोवऱ्यात सापडत असतो. ह्या उलट आयाती दृष्टीकोनामध्ये आयात करणारा निदान निम्मा वर्ग हा माल ठोक वाजवून घेणारा असल्याने तो क्वालिटी तपासूनच आयात करतो त्याला त्यामुळे मालापेक्षा स्वत:च्या भाषेची तिच्या समृद्धीची अधिक चिंता असते. तो माल त्याची संस्कृती समृद्ध करणारा असेल तरच तो भाषांतरांच्या फंदात पडतो. निर्याती दृष्टीकोनात हिमालयीन वंडर घडवणारी माणसेही रातोरात हिमालयन ब्लंडर करताना आढळतात. आयाती दृष्टीकोनात हिमालयीन वंडर घडवणारा माणूस हिमालयन ब्लंडर सहसा करत नाहीच. निर्याती दृष्टीकोनात काहीवेळा भाषे, त्यांना क्षमा कर ते काय भाषांतरीत करतायत हे त्यांना कळत नाही असं म्हणण्याची पाळी जास्तवेळा येते.

•••

सर्वसाधारणपणे कुठलीही संस्कृती ही एक महाजाल असते ती अनेक सूक्ष्मजालांनी आणि स्थूलजालांनी बनलेली असते कुठलीही व्यक्ति ही सूक्ष्मजाल असते लेखक तिला अपवाद नसतो.

व्यक्तित असण्याचे साधारण चार स्तर असतात. हे चारही स्तर नऊ तत्वांनी बनलेले असतात (तत्वांची आकृती पुढे आहे)

१) **विश्विय :** मितीविरहीत अनंताशी जोडला जाणारा स्तर हा अनेकदा आध्यात्मिक म्हणूनही ओळखला जातो.

२) **शारिरीक :** हा सृष्टीने त्याला दिलेल्या शरीरामुळे असतो ह्यात अनुवंशिक गोष्टींचाही समावेश होतो.

३) **संस्कारीय :** माणूस सृष्टीत नुसता असत नाही तो क्रियावान असतो त्याचे सृष्टीतील इतरांशी सतत क्रियाशीलन चाललेले असते अन्न, श्वास अशा गोष्टी तो आत घेत असतो.

सृष्टीचे प्रतिसृष्टीचे त्याच्या आत ठसे उमटत असतात.

नऊ तत्वे : तक्ता

(कुठल्या गोष्टीमागे (ह्यात मितीके, अनुभव वगैरेंचा समावेश होतो) ही नऊ तत्वे असतात)

| स्थिती | सत | चित्त | आनंद | शिव | शक्ति | क्रिया | अवकाश | काळ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| असंवेद्य | सौष्ठव | जाणीव | स्वभाव | संवेदक | असोशी | स्पंदन | पर्यावरण | महाकाल |
| संवेद्य | अंग | बुद्धी | भाव | बोधक | पिपासा | स्फुरण | भूगोल | काळ |
| प्रकट | शरीर | विचार | भावना | कर्ता | आसक्ती | हालचाल | क्षेत्र | वेळ |
| जागृत | देह | विवेक | रस | साधक | इच्छा | कृती | पैस | मृत्यू |
| उन्नत | काया | प्रज्ञा | भक्ति | साक्षी | स्फूर्ती | कर्तव्य | अनंत | महामृत्यू |
| मुक्त | चैतन्य | सत्य | करुणा शांति | बुद्ध | प्रतिभा | कार्य कर्म | पूर्ण | शून्य |

**४) चिन्हीय :** माणूस समाजातून चिन्हसृष्टीतून चिन्हप्रणाल्या प्राप्त करत असतो. त्या चिन्हप्रणाल्या त्यांनी चिन्हे त्याच्या आत साठत जातात.

नऊ तत्वातून ह्या चारी स्तरातून माणसाची आत्मसृष्टी तयार होत असते. लेखक त्यांच्या संहितेतून ह्या आत्मसृष्टीचा ह्या सूक्ष्मजालाचा अविष्कार करत असतो. संहिता ही ही चिन्हांचे एक जाळेच असते.

सर्वसाधारणपणे संहिताचेही चार प्रकार होतात.

**विश्विय संहिता :** विश्वाला केन्द्र मानणाऱ्या संहिता ह्यात येतात विशेषत: धार्मिक व अध्यात्मिक संहितांचा समावेश ह्यात होतो.

**सृष्टीय संहिता :** ह्यात सृष्टीला केन्द्र मानणाऱ्या संहिताचा समावेश होतो. उदा.निसर्ग विज्ञानाच्या संहिता किंवा निसर्ग कलाकृती म्हणजे निसर्गकविता वगैरे.

**प्रतिसृष्टीय संहिता :** ह्यात प्रतिसृष्टीला वा तंत्रज्ञानाला केन्द्र मानणाऱ्या संहितांचा समावेश होतो. उदाहरणार्थ तंत्रज्ञानावरील संहिता किंवा समाजावरच्या संहिता

**चिन्हीय संहिता :** ह्यात प्रामुख्याने चिन्हसृष्टी प्रधान संहितांचा समावेश होतो.

उदाहरणार्थ : भाषा विज्ञानाची संहिता किंवा साहित्य समीक्षा किंवा मृत्यूंजय सारखी महाभारतावर आधारीत कादंबरी.

अर्थात संहितेत एखादा स्तर केन्द्री असला तरी काहीवेळा दोन दोन स्तर प्रबळ असू शकतात. कलाक्षेत्रातील अनेक संहिता तर सर्वच स्तरांना कवटाळणाऱ्या असू शकतात. वाङ्मयावर पोसले गेलेले वाङ्मय हे मात्र अनेकदा केवळ चिन्हीय असते. आपल्याकडे महाभारत व रामायणावर आधारित चिन्हीय संहिता ढीगभर निर्माण होत असतात अनेकदा ऐतिहासिक संहिता ह्याही चिन्हीय संहिता असू शकतात. देशीवाद्यांनी चिन्हीय संहिताचा प्रचंड द्वेष केलाय पण माझ्या मते संहिता चिन्हीय नसते की असते ह्यावर तिचा दर्जा अवलंबून नसतो तर ती काय दर्जाचा अनुभव वा ज्ञान देते त्यावर तिची गुणवत्ता अवलंबून असते.

आज युरोपियन लोक भारतातील विश्वीय संहिताचेच भाषांतर करतांना आढळतात. कारण त्यांना तशी गरज भासते अगदी मराठीतील सर्वात जास्त भाषांतर झालेला कवी आपण काढला तर तो तुकारामच निघतो. जे नेलसन फ्रेजर ह्यांनी (के बी मराठे सह) जवळ जवळ संपूर्ण तुकाराम भाषांतरीत केला होता. तुकारामाच्या कविता विश्वीय आहेत हे स्पष्टच आहे. हे असे होण्याचे सर्वांत मोठे कारण युरोप हा नेहमीच अध्यात्म व धर्माबाबत दिवाळखोर होता हे आहे. त्याउलट आपली अवस्था विज्ञान व तंत्रज्ञानाबाबत होती मात्र युरोपियनांनी ज्या गतीने विश्विय संहिताची आयात केली त्या गतीने आपण सृष्टीय व प्रतिसृष्टीय संहितांची आयात केली नाही आणि मग इंग्रजी ही भाषा आपल्याकडे 'मार्गी' झाली. आपल्या भाषेत त्यांच्या संहिता भाषांतरीत करण्यापेक्षा आपण आख्खी भाषाच आयात केली आज आपण इंग्रजी ह्या मार्गीवर प्रचंड अवलंबून रहायला लागलो आहोत ही वस्तुस्थिती आहे ही अपरिहार्यता आपणच ओढवून घेतली आणि आता ती आपली सवय झाली आहे. हे असे का झाले ?

•••

कुठल्याही संस्कृतीत भाषेचे भवितव्य हे प्रामुख्याने चार लोकांवर अवलंबून असते.

१.बुद्ध वा मुक्त २.वैज्ञानिक ३.तंत्रवैज्ञानिक ४.कलावंत

ह्यातील मुक्त व कलावंत लोकांचा कल देशी भाषेत व्यक्त होण्याचा असतो तर वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक हे मार्गी भाषेच्या आधाराला जातात. मुक्त व कलावंत हे दोघेही अनुभवपंथी तर वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक हे ज्ञानपंथी असतात विशेषत: भारतात तर ह्या दोघात ही कशमकश सतत चालते. वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक ह्यांचे जेव्हा दडपण वाढते तेव्हा संपूर्ण समाजच मार्गी होण्याचा प्रयत्न करतो त्यामुळे मुक्त व कलावंतही 'मार्गी' कडे वळतात सध्या भारतात हेच घडते आहे ह्याउलट जेव्हा मुक्त व कलावंत ह्यांचे दडपण जास्त होते तेव्हा समाज 'देशी' कडे वळतो व ते वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक ह्यांना देशीकडे वळवण्याची धडपड करतात. युरोपमध्येही प्रारंभी वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक 'लॅटीन' ह्या मार्गीतून व्यक्त होण्यात धन्यता मानत पुढे ते इंग्रजी जर्मन वगैरे देशी भाषात लिहू लागले आपल्याकडे विज्ञान व तंत्रज्ञान मुळात चिन्हांकितच झाले नाही ह्याला ब्राम्हण जबाबदार होते ब्राम्हणांनी संस्कृत ही मार्गी इतरांना वापरण्यास बंदी केली शिवाय जातीव्यवस्था निर्माण केली त्यामुळे सर्व ज्ञान मौखिक झाले लिहिणे ही गोष्टच मुळात वैज्ञानिकांना व तंत्रज्ञाना माहीत नसल्याने व मौखिक परंपरेत ज्ञानसाठा करण्याला मर्यादा असल्याने ज्ञानाची वाढही झाली नाही जातीव्यवस्थेमुळे आपल्या उत्पादनाची व उत्पादनव्यवस्थेची रहस्ये ही फक्त स्वत:च्या घरापुरती फार फार तर जातीपुरती मर्यादित ठेवण्याची वृत्ती वाढली त्यामुळे मौखिकता ही रहस्य सांभाळणारी चावी ठरली. सद्या जे लोक मौखिकतेचं कौतूक करतायत ते भंपक व उथळ आहेत. कुठलीही संस्कृती आधुनिक होण्यासाठी ती मौखिकतेतून बाहेर पडून 'लिखित' 'छापील' होणे गरजेचे असते भारत हा प्रचंड मौखिकता प्रधान राहिल्यानेच आधुनिक झाला नाही.

मौखिकतेचा सर्वात मोठा तोटा म्हणजे भाषांतराचा अभाव.

मौखिकतेत भाषांतरे जवळ जवळ होतच नाहीत त्यामुळे ज्ञानाचा प्रसार धांवतो एका अर्थाने मौखिकतेत ज्ञान कुजते मौखिकतेत ज्ञानाची मक्तेदारी प्रचंड असते लिखितमध्ये ती थोडी कमी होते 'छापील' मध्ये ती बरीचशी कमी होते आणि आताच्या चिन्ह संस्कृतीत ती 'मुद्रित' (Recorded) झाल्याने जवळ जवळ नाहीशी होते. ब्राम्हणांनी तथाकथित धार्मिक ज्ञानावरील त्यांची मक्तेदारी अनुवंशीक व कायम रहावी म्हणून मौखिक ज्ञान परंपरेला प्रचंड पाठिंबा दिला त्यामुळे वेद आणि धर्मशास्त्रे ह्यांची भाषांतरे देशी भाषेत झालीच नाहीत. ब्राम्हणेतरांना महाभारत मात्र खुले होते आणि त्यामुळेच गीतेची भाषांतरे आणि भाष्ये प्रचंड प्रमाणात निर्माण झाली. रामायण व महाभारत हे ब्राम्हणांचे जातीव्यवस्था रक्षणाचे छुपे अजेंडे होते आणि त्यामुळेच गीतेमधून निर्माण झालेल्या कुठल्याच चळवळीला मग ती वारकरी असो वा टीळकीय असो जातीव्यवस्था तोडणे शक्य झालेले नाही. त्यांच्या उदारमतवादाला सामाजिक बंधने पडलेली आहेत. ह्या चळवळी एका अर्थाने भाषांतरीत चळवळी आहेत आणि मूळ संहितेतून तिच्या जातीयवादी आशयापासून त्यांना प्रचंड धडपड करूनही मुक्त होता आले नाही. वैदिक धर्म हा जर आपल्या हितसंबंधासाठी ब्राम्हणांनी स्पॉन्सर केला असेल तर पौराणिक महाकाव्यिक धर्म हा इथल्या क्षत्रियांनी स्वत:च्या हितसंबंधासाठी स्पॉन्सर केला आहे. शूद्र आणि अतिशूद्रांना आपल्या क्षेत्रात राबवण्यासाठी तो फार उपयुक्त आहे आणि होता. वैश्यांनी प्रथम जैन बौद्ध व नंतर इस्लाम स्विकारुन ह्या सगळ्या वास्तवापासून सरळ पळच काढला (सर्व जैन व्यापारी आहेत त्याचे कारण ते मूळचे वैश्य आहेत हेच आहे किनारपट्टीवरच्या कित्येक वैश्यांनी इस्लाम स्विकारला आहे) शूद्रांना स्वत:च्या लिखित संहिता निर्माण करण्याची कोणतीही सोय भारतीय व्यवस्थेत नसल्याने आणि 'वार्ता' ज्याला आज आपण विज्ञान व तंत्रज्ञान म्हणतो ही त्यांनी धर्मशास्त्रापासून अलग केल्याने भारतात फक्त ब्राम्हणांनी जी वार्ता जोपासली (उदाहरणार्थ वैद्यकिय विद्या) तेवढीच फक्त लिखित झाली शूद्र अतिशूद्रांची वार्ता लिखित झालीच नाही आणि 'वार्ता' संहितांचा प्रचंड दुष्काळ निर्माण झाला. भारतात आज 'वार्ता' प्रचंड प्रमाणात त्यामुळेच आयात करावी लागत आहे. त्यासाठी 'वार्ता' संहितांची भाषांतरेही आयात होत आहेत. ह्या वार्तासंहितावाबत आपली आणखी एक गोची अशी की ब्राम्हणांचा इथल्या वार्तेशी काडीचाही संबंध नव्हता अपवाद फक्त आयुर्वेदाचा होता. परिणामी 'आयुर्वेद' ह्या वार्तेची तेवढी प्रचंड भरभराट झाली बाकी जी वैश्य शूद्र अतिशूद्रांची वार्ता होती तिच्याशी कसलीही नाळ जुळवून घेण्याची आवश्यकता ब्राम्हणांना वाटली नाही त्यामुळे देशी विज्ञान व तंत्रज्ञान हे उपेक्षेच्या गर्तेत फेकले गेले. वार्ता शिकायची तर ब्राम्हणांना वैश्य शूद्र अतिशूद्रांचे पाय धरावे लागणार होते आणि ब्राम्हणांना जातीय अहंकार इतका मोठा होता व आहे की त्यांना वैश्य शूद्र अतिशूद्रांचे पाय धरणे मानवणार नव्हतेच परिणामी ब्राम्हणांनी संस्कृत ह्या मार्गाकडून इंग्रजी भाषेकडे संक्रमण केले आणि इंग्रजीचे रुपांतर मार्गीत केले. भारतीय वार्ता इंग्रजी वार्तेच्या तुलनेत काही ठिकाणी मागासलेली होती त्यामुळे हे संक्रमण सोपे झाले आणि विज्ञान व तंत्रज्ञानात महारत हासील करायची असेल तर इंग्रजीशिवाय पर्याय नाही असा अपप्रचार सुरु झाला नंतर तो सांस्कृतिक सवय झाला त्यामुळेच युरोपात लॅटीन पासून मुक्त होऊन इंग्रजी, जर्मनी, वगैरे देशी भाषा जशा वार्तेच्याही भाषा झाल्या तशा भारतीय देशी भाषा झाल्या नाहीत आणि इंग्रजी ही लॅटीनप्रमाणे नाहीशी न होता आपल्या बोडक्यावर बसली.

भारतीय जातीय व्यवस्था ही एक अत्यंत कर्मठ अशी देशी व्यवस्था आहे ती स्थलातंराच्या प्रक्रियेला रोखते परिणामी इतरांच्या संपर्कात येऊन काही बदल घडण्याची जी शक्यता वार्तेसाठी होती तीही नाहीशी झाली. ह्यात भरीसभर म्हणून ब्राम्हणांनी दोन सिद्धांत मांडले.

**१.क्षत्रिय नाशाचा सिद्धांत :**

परशुरामाने पृथ्वीवरील सर्व क्षत्रिय नाहीसे केल्याचे प्रतिपादन हा सिद्धांत करतो ह्या सिद्धांतामुळे 'मुसलमान' आक्रमकांना स्वत:ला क्षत्रिय म्हणून स्थापित करणे सोयीचे झाले.

**२.वैश्य गायब सिद्धांत :**

दहाव्या शतकानंतर वैश्य हे पृथ्वीवरुन गायब झाले असे प्रतिपादन हा सिद्धांत करतो ह्या सिद्धातांमुळे इंग्रज आक्रमकांना / अरबांना स्वत:ला वैश्य म्हणून स्थापित करणे सोपे गेले.

ब्राम्हणांच्या ह्या दोन सिद्धांतामुळे क्षत्रिय व वैश्य हे दोन्ही वर्ण गायब झाले आणि ब्राम्हण व शूद्र हे दोन वर्ण उरले. ह्याचा सर्वात मोठा फटका वार्तेला बसला. वार्ता ही सतत वाढत गेली तरच टीकते अन्यथा ती गोठते भारतात हेच घडले. युरोपातल्या औद्योगिक क्रांतिने वार्तेला मानवी ज्ञानव्यवस्थेच्या केन्द्री आणले आणि वार्तासंहितांची भाषांतरे ही काळाची गरज बनली. दुर्देवाने तत्कालीन सुशिक्षित समाजाने ती ओळखली नाही कारण ज्यांनी ते ओळखायला हवे होते ते वैश्य शूद्र अतिशूद्र अडाणी होते आणि ब्राम्हण क्षत्रियांना त्यात फारसा रस नव्हता वार्ता भाषांतरीत करण्यापेक्षा ती सरळ इंग्रजीतून वाचणे व साध्य करणे हे त्यांना सोपे व सोयीस्कर होते आज भारतीय शेतीची जी दूरावस्था आहे

त्याला ब्राम्हण क्षत्रियांनी वार्तेकडे फिरवलेली पाठ फार मोठ्या प्रमाणात जबाबदार होती हा शूद्रांना व्यवसाय झाल्याने तिला कधीच ब्राम्हण क्षत्रियांनी प्रतिष्ठा दिली नाही. त्यामुळे आजही शेती विषयीचे प्रश्न ज्ञानचर्चेत दुय्यमच मानले जातात. शेतीविषयीच्या संहिता ह्या चर्चेच्या परिघातून बाहेर फेकल्या जातात भारतात धर्मशास्त्र. अर्थशास्त्र (कौटील्यीय अर्थाने एक पुरुषार्थ म्हणून) कामशास्त्र आणि मोक्षशास्त्र ह्यांना जी प्रतिष्ठा मिळाली ती कधीही वार्तेला मिळाली नाही कारण ह्या चारही शास्त्रांची गरज ब्राम्हण व क्षत्रियांना होती वार्तेची गरज ही फक्त वैश्य शूद्र अतिशूद्र ह्यांनाच होती. वार्तासंहिताची देशी भाषेत भाषांतरे व्हायची असतील तर ब्राम्हण क्षत्रियांनी तीचा स्विकार करणे भाग आहे किंवा वैश्य शूद्र अतिशूद्रांना भाषांतरकर्ते होणे भाग आहे अन्यथा 'मार्गी' द्वारे वर्चस्व व मक्तेदारी ठेवली जाणे अटळ आहे. ह्याबाबत वैश्यांनी जी ट्रस्टींची गांधीवादी जबाबदारी पार पाडायला हवी होती ती पाडली आहे असे वाटत नाही. वैश्य हा वर्ण पूर्वीपासून सतत खुला वर्ण आहे. त्यात कुठलीही जात जमात सहज प्रवेश करु शकते. अगदी पारशी आणि सिंधींनाही वैश्य वर्गात प्रवेश करुनच आपली स्थिती भक्कम करायची संधी मिळाली आहे पण गांधीचा अपवाद वगळता कुणाही वैश्याने देशी भाषेची पाठराखण केली नाही वैश्यांचे मार्गीला जाऊन मिळणे आणि देशीकडे पाठ फिरवणे ही भारतीय इतिहासातील फार मोठी भाषिक शोकांतिका आहे. वैश्य पुरेसे शिक्षित नसणे ह्याचा त्यात प्रचंड वाटा आहे. (वैश्य खूप सुशिक्षित होते असा गैरसमज बऱ्याच भारतीय लोकांनी करुन घेतला आहे.)

•••

भारतीय दर्शनांची मांडणी करण्याचा ज्या पद्धती आहेत त्यात प्रामुख्याने ब्राम्हणी आणि क्षेत्रीय पद्धतच प्रभावी असते ब्राम्हणी पद्धत सहा दर्शने मांडते व वेदांना केन्द्रीय ठेवायला पहाते त्यामुळेच ब्राम्हणी पद्धत दर्शनाची वैदिक आणि अवैदिक अशी विभागणी करते क्षेत्रीय पद्धत वेदांना रिप्लेस करुन भक्ती केन्द्रस्थानी आणते आणि ब्राम्हणांना रिप्लेस करुन राम आणि कृष्ण ह्या क्षत्रियांना केन्द्रस्थानी आणते आणि ह्यांची किंवा ह्यांच्या विष्णू वगैरे मूळ रुपांची भक्ती करायाला सांगते किंवा विठ्ठला सारख्या देशी रुपांना आराध्य दैवत बनवते. भारतीय दर्शनाची विशिय पद्धत कुणी मांडलेली नाही म्हणून ती मी इथे मांडतो आहे.

आर्य भारतात येण्यापूर्वी भारतातील सिंधु संस्कृती व द्रवीड संस्कृती ही विशतेबाबत चांगलीच पुढारलेली होती त्यामुळेच आर्यांनी स्वत:ला ब्राम्हण क्षत्रिय म्हणवून घेऊन स्वत:ला उच्च स्थानी ठेवले आणि इथल्या सर्व जनतेला वैश्य वर्णात ढकलून दिले (माननीय भगवान श्रीकृष्णांनीही पापयोनीत शूद्रांबरोबर वैश्यांनाही समावेश केला आहे. भगवद्‌गीतेत आपण पापयोनी आहोत ह्याचीच अनेक वैश्यांना कल्पना नाही) पुढे ह्या वैश्यांच्यातून शूद्र अतिशूद्र अशा विभागण्या होत गेल्या मात्र इथल्या लोकांनी मूळ दर्शने ढळली नाहीत ही दर्शने पुढीलप्रमाणे होती

१.श्रमण २.शैव

जैन हे श्रमणाचे आताचे रुप श्रमण परंपरेतून प्रथम जैन व नंतर बौद्ध हे दोन धर्म जन्मले हे दोघेही जातीव्यवस्थेच्या विरोधी होते शैवांनी तर नेहमीच इथल्या जातीव्यवस्थेविरुद्ध दंड थोपटले पुढे कर्माने वैश्य असणाऱ्या तूकारामाने असाच लढा दिला गुरु नानक हे पुन्हा वैश्य वर्गातून आलेले त्यांनीही शीख धर्म स्थापन केला आणि तोही समतावादीच होता बौद्ध काळात भारताची व्यापारात प्रचंड भरभराट झाली हा काही योगायोग नव्हता मूलत: विश वृत्तीतून तो जन्मल्याचा झालेला परिणाम होता. बुद्ध हा एखाद्या वैदिक दर्शनकारापेक्षा कमी आणि वार्ताकारासारखा अधिक बोलतो. जैनाचा अनेकांतवाद (अनेक मार्गांनी सत्य सापडू शकते वगैरे) बुद्धाचा विज्ञानवाद शैवांची बहुआयामी भक्ती व तंत्र आणि योग (ह्यातून नाथ संप्रदाय सिद्ध झाला) तुकाराम व नानकांचा एकेश्वरवाद ह्या साऱ्यांचा एकत्रित परिणाम म्हणजे विशता होय त्यामुळेच भारतातील विशता ही पंचदर्शनी आहे.

**विशता**

| जैन | बुद्ध | शैव | विश वैष्णव वा एकेश्वरी | आदिवासी |
|---|---|---|---|---|
| उपनिषदीय | भगवान बुद्ध | विरशैव | तुकाराम | |
| ऋषभदेव | बोधी धर्म | नाथ, शाक्त | नानक | |
| महावीर | | बसवेश्वर | | |
| \| | \| | \| | \| | |
| रजनीश | आंबेडकर | महात्मा फुले | महात्मा गांधी | |

ब्राम्हणांनी शैव पूजाऱ्यांना गुरवाचा दर्जाका दिला ? तुकाराम, नानक, महात्मा गांधी हेच नेमके कसे काय धन कसे जोडायचे ग्राहकांशी कसे वागायचे ह्या विषयी बोलतात ? हे सगळेच अंतिमत: कम्युनिझमच्या विरोधात का जातात ? ह्या सर्वांनाच अध्यात्म आणि बहुजन हिताय बहुजन सुखाय अशी सांगड का घालाविशी वाटते ? आणि नेमके हेच सगळे जगभर का पसरतात ? (शैवातील बाहेर 'योग' हाच सर्वत्र जास्त पसरला पतजंलीचा योग किंवा कपीलचे सांख्य हे इथल्या देशी योग परंपरेचे मार्गी भाषांतर आहे) आणि भारतात नेमके हेच लोक मार्गी परंपरेकडून साईडला का

*(पृष्ठ क्रमांक ४० वर)*

# मंगेश नारायणराव काळे

## काढ माझे चित्र

१.
काढ माझे चित्र
टोच सुया हातात खेळव रक्त नसात
मनात ठेव हुंदका दाबून
मोज माझा ठेका
८० ८२ ८१ ८३ ८१ ९०
५२ ४८ ४६ ४२ ८० ८२
उकळलं शुभ्र डांबर
सांडला कापूस काळा ठिक्कर

गोगलगाय गोगलगाय
तुला पाय किती हाय ?

ये यमा अन् काढ माझं चित्रं
नको लावू फ्लॅश
डोळे दिपतात चष्मा हरवलाय
नेकेड काढतो का कपड्यासकट
ब्लॅक अॅन्ड व्हाइट की फुलऽऽ कलर
अगोदर तेवढं डेमोस्ट्रेशन दाखव गड्या

२.
इथे नळी तिथे नळी कुठे नळी
इथे हवा तिथे हवा कुठे हवा
इथे श्वास तिथे श्वास कुठे श्वास
इथे धड्कन तिथे धड्कन कुठे धड्कन
इथे अंगार तिथे अंगार कुठे अंगार
इथे झोप तिथे झोप कुठे झोप
इथे इसीजी तिथे इसीजी कुठे इसीजी
इथे फुगा तिथे फुगा कुठे फुगा
डॉक्टर डॉक्टर माझं बी.पी.चेक करा हो ऽऽऽ

३.
मी काढतो तुझा फोटो
मी काढतो तुझी निगेटीव्ह
मी काढतो तुझ्या रेषा
मी काढतो तुझी छाती
मी काढतो तुझा सापळा
मी काढतो तुझी शुगर
मी काढतो तुझी युरीन

पाठ गेलीय बसून बसून
बसून बसून पाठ गेली
अन् छातीचा भाताही फुटायला आला ऽऽ हो

४.
एक बिनकाळजीचा माणूस
एक बिनकाळजाचा माणूस
एक काळीज हरवलेला माणूस
एक माणूस हरवलेलं काळीज
एक काळजी हरवलेला माणूस
एक माणूस अधिक काळजी उणे काळीज

वो हड्डी कम मारो भैया
कलेजा जादा देना हो ऽऽ
बच्चोंको भोत पसंद है

५.
एक गच्च हवेचं सिलेंडर आहे
दोन्ही हातांनी झाकता येईल येवढं आभाळही आहे
भरपूर झोपून झालेला पलंग तर आहेच दिमतीला
अॅडशिनल भरपूर सांडून झालेली सलाइन आहे

तशीऽऽन एक उशी निजूनऽऽ झालेली
एक स्टेस्थोस्कोप लावून झालेला छातीला
एक माणूस जगून झालेला

या बाळांनो या रे या ऽऽ
लवकर झरझर सारे या

त्वरा करा रे त्वरा करा
आजचा दिवस आपुला समजा

६.
शेवटालोक तिरकामठा पाठीवर
शेवटालोक नजर धुंडाळते शिकार
शेवटालोक मासाचे खमंग वाक्य जिव्हेवर
शेवटालोक असह्य ताण तिरकामठ्याचा वादीला
शेवटालोक सुटत नाही बाण आपल्या हातून
शेवटालोक येत नाही टप्प्यात सावज
शेवटालोक कंटाळा येतो नुस्ता कंटाळा
शेवटालोक आपण नुस्ती कूस बदलवतो
शेवटालोक कोण येते सोबत शेवटालोक
शेवटालोक सोबत येते शेपूट शेवटालोक
शेवटोलोक हाती उरत नाही काही हाती
शेवटालोक बाण पुरत नाहीत भात्यातले

शेवटालोक आपण तरी कुठे राहतो
दिनकरबुवा ?

७.
तुटो शेंडी पारंबी तुटो
तुटो दोरीचा मध्य तुटो शेवट
तुटो तार तुटो भारा मधोमध
तुटो आजन्म कासावीस कासव
तुटो संभोग आंधळा तुटो शरीर
तुटो आर भोवरा फुटो दोन खापा
तुटो काटा घड्याळाचा तुटो वेळ
तुटो पणती वात तुटो तुटो जाळ
तुटो संध्याकाळ रात्र दिवस तुटो एकदाचे
तुटो माणसाचे येणे जाणे तुटो गुन्हाळ

८.
राहू दे गर्भ निथळते केसातून वळतांना
राहू दे कमळ पाण्यात सूर्य एकटा मावळतांना
राहू दे आंडात रग वीर्य देहात सळसळतांना
राहू दे श्वास कोंडलेले दोन पाया मधले मधले
राहू दे भर्जरी स्वप्न ओसाड डोळ्यात थिजलेले
राहू दे शेकोटी एकटी थंडीत सावली हलतांना
राहू दे नाद नाडीत ठोके मंद सुरात सरतांना
राहू दे डोहात शिंपले काठ उदास ओसंडतांना
राहू दे धडकन तेजीत जीव भुकेला व्याकुळतांना
राहू दे राहू दे राहू दे राहू दे राहू दे राहू दे राहू दे राहू दे

जे दिले ते तरी राहू दे रे ऽऽ मि.गॉड

९.
मासळ्याच मासळ्या मासळ्याच मासळ्या
पाण्यात मासळ्या अंगणात मासळ्या
दारात मासळ्या घरात मासळ्या
ताटात मासळ्या पोटात मासळ्या
मासळ्याच मासळ्या मासळ्याच मासळ्या

एक मासळी गावली जाळ्यात
तिला नेवून सोडीन पुन्हांदा तळ्यात

दोन मासळ्या गावल्या जाळ्यात
त्यांना सोडीन नेवून मळ्यात

चार मासळ्या गावल्या जाळ्यात
दोन मळ्यात दोन तळ्यात

मासळ्याच मासळ्या मासळ्याच मासळ्या
मासळ्याच मासळ्या मासळ्याच मासळ्या

१०.
मन यंत्र मन तंत्र मन मंत्र
मन संत्र मन केळी मन चिकू
मन गाजर मन टमाटर मन गोभी
मन झेंडू मन गुलाब मन मोगरा

मन कटोरा मन झोळी मन आरोळी
मन जादू मन टोना मन बिछौना
मन पाणी मन आकाश मन सोना
मन लवडा मन गेवडा मन बेवडा
मन आरी मन पारी मन जेजूरी
मन तार मन पार मन धार
मन सूत मन धागा मन गादी

मन मन का ये भेद होय
मण मण का बोझ ढोय
मन गूसाई फिरत है
मन को चैन न होय

११.
कंटाळा आलाय नुस्ताच कंटाळा
कंटाळा नुस्ता कंटाळा कंऽऽटाऽऽळा
कंटाळा टाळा कं टाळा कंटा ळा
कंटाळा धरुन ठेव धरून ठेव कंटाळा
टाळं लावा एक कंटाळ्याला टाळं लावा
टाळ कवटाळ कडकडून कंटाळ्याला

ॐ पूर्णमद: पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥
ॐ शांति: शांति: शांति:।

## आपण टाळ खाली ठेवले

१.
पहिलीला खुरपली माती
बारीक सारीक दाणा गोटा
निवडून बिवडून केली माती सुपीक
सुपीक भरले दांड दांड पाणी

मातीला हौस वळवाच्या थेंबाची
आपण वॉटर स्प्रे दुवार दुवार चालवला
गवती जमीन धुवाँधार ओलेती
पडीक पाडून
पसार जीवलगा

२.
दुसरीचं टाइमिंग
जुळलं नाही बोटाला
आपलं मायमिंग तिच्या आलं नाही ध्यानी
थंड स्तनांचे पिरॅमीड उसवता उसवता
थकलो भागलो गुणलो विणलो
आडा उभा पाठ केला पाढा
आढा सुटला नाही सुटता पायाचा
नशिबाशी गांडू मानून
मलूल दिवसाचं चाबूक
गरगर हवेत फिरवलं वरचेवर
कशिदा मातीचा लपेटून दुसरीला लावली दुसर
तरीही कसता आली नाही ही
इनाम जमीन आपल्याला

३.
तिसरीची
बासरी मऊशार
ओठावर रेंगाळत राहिली
आपलं सुराचं टेम्परमेन्ट एकदम भूगोल
वाजवली वाजवली
नाही गावली मासळी आपल्या काट्यात
बासरीला भोकं दहा
अन् आपण एका हातानंच
ताल धरत राहयलो

४.
चौथीच्या वक्ताला
चवचाल दर्या आटल्यावेळी
उपसले खाटल्यावर ढिग
चालवले आपसूक धर्तीवर
चितचोर धरतीवर आस्ते आस्ते निजवले
विझवले पायाशी पायथ्याशी पायघोळ

५.
पंचमात बोट घातले म्हणजे बद् आवाज येतो
धडका सुरु राहतात गळ्याच्या खोल कपारीत
सुरानं वृषण पाषाण फोडून करतं मऊशार माती

मस्तीत निखल तुडवत
टरार शेपूट उंचावून देतो जांभई

पाचवीच्या नमनाला
असं झालं

६.
महाबीला बोटं अकरा
म्हणून हातात हात न्हाई घेता आला
ती म्हणायची कसेल त्याची जमीन
उपसेल त्याची माती
आपण म्हणलो आमीन आमीन

७.
सातवीला घोर झाला
जोर केला नुस्ता नुस्ता
आपल्या दंड बैठका रोज तालमीनं सुरु
अंगाला माती लागल्याशिवाय राहयलो नाही
राहिलो नाही इतक्यांदा भरदोर पावसात

ती म्हणाली मातीतून आलास
मातीत जाशील
फायनल जजमेन्टला
मातीतूनच येशील

अन् आपण टाळ खाली ठेवले

## नसल सापडत एखाद्याला आभाळ

१.
रात्रींमागून रात्र
माणसामागून माणूस
बाईमागून बाई
मुलांमागून मुलं

फेरीवाला विक्रेता दुकानदार दुधवाला
शाळा कॉलेज घरं दारं खिडक्या पडदे
मागून येताय एकमेकांपासून काहीन् काही

ह्या आमरण भिक्षेकरीता

सुटत नाहीत मागून
एकटेपणाने कायम
घेत रहतो झोके छताला
उघड्या नागड्या आयुष्याचा दोर
अन् नंतरचा येणारा करतो खुदकुशी
मागून

२.
ह्या धवल पायाळू दिवसात
पिकलंय आपल्या नवथर कळीला बोंड लख्ख
सुताचे कसोशी भेंडोळे
गरगरत सुटतेय धाग्याच्या विणीतून
विणल्या जातेय लोकर काळपट
सुखाच्या धाग्यातून
काळवंडलेली मलीन मलूल

नुस्ता बंधच धाग्यांना करतोय सुटा
त्वचेवरुन सरसकट अलगद
अन् काळाचे अजस्त्र डोळे
असंख्य धाग्यांच्या कोलाहलात
शोधताय धागेदोरे असण्याचे

३.
स्पर्श करते जिव्हाग्राला निळीभोर शाई
लपालप जीभ ओढते
त्वरेने शाईचे जीवनसत्त्व
चालते समूळ कागदावर
एकटाकी आपली जिव्हा

जिला असतं एक शरीर
एक रौरव एक धूनी
एक तांडव एक रुद्र
एका मंद्र चालीवर स्थिरावते नीब
आपले टोकदार टोक
अन् लिहून काढते जिवाच्या आकांतान
एक अल्कोहोलिक कविता

४.
भरून घेतो फ्लॉपीत आपण
प्रोग्रॅम शिताफीनं
हार्डडिस्कवरनं घेतलं कॉपी करून म्हणजे
राहतो बिनघोर
किती राहिलेत बाईटस् शिल्लक आपले
पाहता येतं सालोम'·।
फुटायच्या आत माठ
भरून घ्यावा लगोलग
पाण्याचा थिकनेस
बुडल्याशिवाय नाही कळत
वळत नाही जीभ
आपसुक समेवर

की-बोर्ड सरावाचा झाला चवचाल लाईफचा
म्हणजे आपला स्वीच ऑफ करायला जातो सोपा

५.
आपण करतो खातरजमा निवळण्याची
खाज सुटत राहते आपल्या असण्याला
आपण खाजवतो स्वत:ला
वाजवतो आतल्या आत कहाळ
गहाळ झाल्या दिवसांची मोजदाद करतांना
लागू देत नाही तोशिष उपऱ्या दिवसांची

आपण म्हणजे कधी मधी असतो सार्वभौम
कधी असतो आपण नुस्तीच तुटलेली तार तंबोऱ्याची
जी आवाज करते बद्
आपण काहीही असू शकतो
केव्हाही कधीही कुठेही
चितळतो विरघळतो मळमळतो हरदम
तरी सुटत नाही खाज आपल्यातून
असण्याची

६.
एकेक पायरी रात्रीची
हात दमछाक चढतांना
उजेडाचा डोंगर दूर असतो नजरेच्या टप्प्यात
खाजवत स्वत:ची आगाळ
आपण कोरतो नजरेनच चार भिंतींचं प्लॅस्टर
करतो एकसंध वीट मोकळी जुनाट बांधकामाची
पडझड उसवतो बोटांनी

येत रहावं लाटांनी खडकाच्या जवळ
अन् दगडांनी बदलत रहावी कूस
पाण्यातल्या पाण्यात

फुटतो उर लाटेनं खडकाचा
अन् दगडानं होत जाते लाट विवस्त्र

कोणताच तर्जुमा नस्तो माण्साजवळ
तरीही धडका देणं सुरुच रहातं
लाटांचं किनाऱ्यावर

७.
दिसत नाही डोळ्यांना निरभ्र आकाश
ढगाआडून पाहयला करावी लागते मान तिरकी
सोसवत नाही डोक्यावर
रिकामटेकडेपणाचा दगड
नुस्त्याच भगभगीत उजेडाने
व्यापून गेलंय शरीर
भागत नाही शरीर दुसऱ्याला
पाहिजे एखादी गुणी मुलगी
आपलं अख्खं आभाळ कॅलक्युलेट करायला
तापायला हे खळाळत डांबर
पाहिजे मोठी भट्टी
नुस्त्या चिनगारीनं पेट घेत नाही
आपलं येडझवं मशीन
ऑईल पाणी टाइम टू टाइम चेक करावं लागतं
भरावं लागतं इंधन

रोजमर्रा जिंदा राहण्यासाठी
नसल सापडत आभाळ एखाद्याला

म्हणून हवेत फुगे सोडायची
काय जरुरत आहे ?

## हेमंत दिवटे

### ☐ थांबताच येत नाही

कुठल्या भाषेत व्यक्त करायचं ?
व्यक्त करायचं म्हणजे काय व्यक्त करायचं ?
ग्लोबलायजेशन चांगलं की वाईट ?

स्वत:चा विचार करायचा की जगाचा करायचा
आपण एकटे आहोत की गर्दीतले आहोत
भाषा टिकेल की नाही, मुलांना कुठल्या मिडियममध्ये घालू ?

आपण कधीही शून्य होऊन जाऊ
बॉम्बस्फोटात कचरा होऊन जाईल आपला
कुणीतरी आपल्याला भोसकेल, कच्चकन पोटात शिरेल चाकू?

मुलं शाळेतून परततील का, या महिन्याचा पगार मिळेल का ?
आपण खरंखरं बोलायचं की खोटं बोलायचं ?
देव आहे की नाही, बाबाच्याकडे, गेलो की बरं वाटेल का ?

आपल्याला हार्ट अॅटॅक आला तर, पाऊस पडणं बंद होईल ?
प्रदूषण, बेकारी वाढलीय, किमती वाढताहेत सगळ्यांच्या ?
कुठला पिक्चर बघायचा, की गावाला जायचं ?

आई-बाबाला सांभाळावं की सांभाळू नये ?
सरकार काय करतंय, टॅक्स कसा वाचवू ?
तो बटाटावडावाला जाम कमवतो गळ्यात जाड्या गोल्डचेन ?

आपलं वीजेचं बील एवढं, तिकडे तर लाईटच नव्हती
तडफडून मेलं भुकेविना, उष्म्याने, डेंग्यूंनी, पुरात मेले
मग कॅलेंडरात का असतात बाराही महिने, करप्शन करप्शन

नेट डाऊन आहे, आपला पत्ता काय ?
कित्येक दिवस भेटलोच नाही, फोनही नाही
टिव्ही बंद आहे, क्यूं की सांस भी कभी बंद थी

भिकारचोट, डिप्रेशन, भूतबाधा, शालाबाई आलीय
भयानक आवाज तिच्या फटक्यांचा, वासुदेव कोण होता
नंदीबैलाला भिकेला लावलं, खुरडत खुरडत चालणाऱ्या

भिकाऱ्याला भीक देऊ की नको, कुठल्या गँगचा असेल ?
गाडीतून तो दाढीवाला बॉम्ब ठेवून तर उतरून नाही गेला ना ?
ह्या वस्तीतून जाताना भीती वाटते, का वाटते ?

कॅडबरीत अळ्या, कोक-पेप्सीत विष
क्लबमुळे सगळीकडे उंदीर, दारं-खिडक्या बंद
नवरात्रोत्सव, कचऱ्यात कॉन्डोमच कॉन्डोम

च्यायला बाईला चौथीपण मुलगीच !
कारखाना काढलाय, कामवाली येणार नाही, फोन आला
कालच फोन केलेला तेव्हा बरा होता मामा, आज फाटकनच

एकत्रित चहा पिलो मागच्यावेळी, इंग्रजी छान बोलते आजी
चिमार लफडी करतो तो, शेअरबाजार मंद आहे
साला धंदा डुब गया, चोरी करता है

हल्ली येत नाहीत मतं मागायला, बेल बंद आहे
फोन चालू, दरवाजा बंद करुन घे, मराठीत बोला राव
आयचा घो, थँक्यू यु. कुछ तो लफडा हो गया

वेडा की खुळा दोसौ में आती है वो - बारा बजेके बाद
नौ बजे जायेगा तो हज्जार बोलेगी,फारच टाईट होते पॅन्ट
ठंडा पिऊया की कॅप्युचिनो, उद्धट आहे

कल वापिस आना होगा, मराठी माणूसच दिसत नाही
हळू बोल यार हळू,भेन्चोद मजा आ गया
कॉलसेंटरला कर नौकरी बकबकचा पैसा

घेवू लाल रंगाची गाडी पार्किंगमध्ये ठेवू
पगार वाढवलाच नाही
सेक्सी पाठव एसएमएस चुतिया बनवू मजा येते चाळीतच

फुकट खाऊ फोदरीचा सगळे कवी मार्क्सवादी असते तर
हिजडा आहे मेला, बोल यार इनकमिंग फ्री
शॉपर्स स्टॉप समोर भेट, उद्या करु काहीही

किमान गॉड चॅनेलतरी बघू ,आजारी पडलेत सगळे मेन्टली
सर्दी आणि खोकला, वाटाणे भीजत ठेवलेत
वाटाणे भिजवून मिळतात, रिलायन्स तेरा लाख-लाख शुक्र है

चौपाटीवर फुलवून मिळतं अंग फटाफट
गरमागरम भजी डबलफ्राय, सिनेमॅक्सला गर्दी
पोरी सॉलीड आहेत लवकर लिक्विडतात

क्रॉसवर्ड-क्लासवर्ड, कालचा पिज्जा पचलाच नाही
देशी औषध हाजमोला, लालू यादव धमाल
काय पन शो आहे, आयचा घो

काल सेंटरवरची मुलगी, नको रे बाबा
गो मस्ट गो ऑन अॅन्ड ऑफ मस्त धष्ट पुष्ट स्वस्त
सही रे सही 'चा बार' दो रुपयेका, चाय चालीस मे

स्टाईल यार हिच्या आयला, डबल सोडा नकोच व्हिस्कीत
कंटाळा आला कंटाला, माझ्यातूनच येतो केमिकलचा वास
भयानक महाग पेट्रोल, लोकं रस्त्यावर कसे हगू शकतात ?

आपल्याला टेन्शन, फुसकी मारु कि खोकत पादू
याई साडीत छटाक दिसते
फालतू तूलफा तुलआ आलतू वीक कवी

पेस्ट कंट्रोल करायचयं, बाबगिरीचा धंदाच टाकतो
पाचव्यांदा पाहिला यार बेंबाट माधुरीचा
कॉकरोच फार झालेत फाईव्ह स्टार मनात

क्रॉक्रिटचे आहेत टॉवर मेन्टेनन्स खूप
पॉलीसी घे डिसीजन एसी मन शॉकिंग
गाडी खाली दोन मेले, वर्गणी मागू नका

व्हीआरएसला पर्याय नाही, पाठ फार दुखते
नोबेल मिळालं तर अब्दुल कलाम पण कवी
वाजपेयी पण मी पण

बीटा नको युमॅटिक, कानाखाली खेच
बॉस बरा आहे, डोक्यात फार विचार येतात
प्रचंडच प्रचंड लांबीचा, मेनरोल मनाचा

मुल फार हुशार, काहीतरी भानगड आहे
टेप बिघडलीय टेप लावू, डिटीपी कुठे करतो
डॉगशॉट म्हणजे काय हो ?

क्लोजप, मायक्रोवेव काय झक मारायला आणलाय
शोध शोध दोन पुळ्या छातीवरती
लॉटरी कुठली काढू, हिंट दिली असतीस तर

विल्स सोड चक्कर येते, हो बीसलरी एक थंडा
कसलं सामाजिक भान, कुत्रे सोडले पाहीजेत साल्यांवर
पाणी मार, सर्कस बघायला मी काय च्युत्या हे

खानोलकरांचा फटव्हिडीओ, बँक देते ना लोन
कशाला घाई करतेस, मरगळलोय आज
पेंटींग्ज कशी वाटली, माऊंट अबूला जावू या का ?

वस्ताद आहे, विमान पडलं
तुझ्या बापाच खातो काय
ड्युप्लीकेट मिळते रे इथे

फॅन हळू कर, कविता कशाशी खातात
गांड में नही गूँ और हगने चला जुहू
वकीलसाहेब डिव्होर्स पटकन पाहिजे

मुल झोपली की करु, बडबडू नकोस
दोन गोल्डफ्लेक और एक माचिस एमपी-३ प्लेअर
GILI पेक्षा वामन हरी बरा

सुर्या टिव्हीला रात्री ११ नंतर, कालच प्लॉट विकला
पचकन थुकताच लोक अजून, गांड फाटली रे
आज सुटी, लाईट्स, आवाज नको

मला आवडते काजोल दसका दो चारानेका पाच
उद्या भेटू या का आज थकलोय उद्या नक्की
कोलटकर होते ना, पोराला बुद्धी म्हणजे काय ते कळलचं नाही

आयोडेक्स लावतो थांब जांभया किती देतोस
क्लासीकल नको रिमिक्स भैयांनीची मजा आली
पोट काही कमी होत नाही वाटोळं हाईल तुझं

शाट्टाला कविता लिहिता, जमलं म्हणून समज
हगे भरतोस ना नीट, विश्वास ठेव
अशात नाही आला, गंमत आहे प्रेशर नॉर्मल आहे

ब्लड युरीन चेक करुन घ्या
सायबर बाबा कठीण आहे
अल्ला के नामसे देरेबाबा

लाज नाही वाटत, क्रेडीट कार्डच जाम बील आलयं
फर्निचर नविन आहे एमआरआय करु या का
व्हायरस अपडेट केला शिटी बाजाओ मत

वादळात तिनशे बोटीतले, ऐश्वर्या डोळे हे जुल्मी गडे
स्क्रिनसेव्हर डाऊनलोड केला, हगून आलो छान
दिमाखसे काम ले, अपॉईन्टमन्ट नाही आज

हाजीमंलग या श्रीमलांग या डेल्टा फोर्स
टॉमी आजा बेटा टॉमी टॉमी टॉमी
केस किती वाढतात, वाईट बातमी हे ववन

आकडा लागला उद्या ड्राय डे
दे ताळू ये ताळू बंधू बिनधास्त
धावा-धावा पीडीएफ फाईल उघड

मलायका अरोराच रे ती, संडास साफ नाही होत
कोकाकोलाची नवी अँड पाहिली
मला राम्पाट निग्रोला लावायचय रिटर्न फाईट केलं

गुड आहे साला, गार्डन बंद असतं
मेल बाऊन्स झाला, मनी प्लान्ट लाव
लिपस्टिक एस-३ व नेलपेन्ट वैताग

उदबत्ती कोण लावतो या भोकात
वाट लागली, सेक्स मेंदूत असतो
जेवता की झवता

प्रोग्राम करप्ट झाला उशिरा परतलो
हिन्दुत्ववादी नाही तो वापरुन घ्या
गैरसमज नको मेला मेला मेला मेला

डोन्टी स्पीक माल्या आय कॅनॉट यू
किती वाजता भेटतो ब्लो जॉब कर
झिंगझिंग सिंगापूर कि सिंगापोर

मीग करतेस ना हलकासा पाऊस पडेल
संपतच नाही वेळेवर आलास
दिसताच गोळ्या घाला बरोबर औषध घे

किस कर मूलं बनवून मिळतील
गोळ्याच घातल्या इनर्वोक्स तडफडतोय
चड्डीत मावेनासे होते इथेही धर्म लुडबूडतोय

प्रींटआऊट दे डीएनए टेस्ट निगेटिव्ह
डिलायटेड गर्दी टेक्नॉलॉजी शिवाय लाईफ नाहीच
एड्स नसता तर झवझवाट असता

पाडा झोपडपट्ट्या पाडा बिल्डींगी बांधा
डांबरावरुन जावू नकोस डांबरटा
टाळ्यापिपळ्यांचा आवाज सेव्ह करुन ठेव

रिमिक्स करुया ना उठता उठत नाही
थंडा मतलब कोकोकोला
ऐंगेज आहे किंवा नेटवर्क बीझी

पासवर्ड बदलून टाकला पाहिजे
नेटवर्क अँमवे २१ एक्स्पोजर भयानक
ह्याच्यावर मारल पाहीजे एक जात इन्जॉय

ग्रेट जॉब फिल गुड फॅक्टर
व्यवस्थेचा भोसडा गर्दीत चिमणराव
पार्क करुका तुझ्यात माझी मोटर

कोड लॅग्वेज कळते का लवकर ठरव
रिमार्केटेबल थांबूया का थोडा वेळ
धांवताच येत नाही

## ☐ मेल अॅड्रेस

पेन्टीअम 4 प्रोसेसरच्या छाताडातून
मी लॉगऑन सातासमुद्रापार
मित्राबरोबर करतोय Chat
माझ्या अगोदरच त्याला माहित मालेगांवची दंगल
शिवसेनेचा दसरा मेळावा
आशा भोसलेला मिळालेला पुरस्कार वगैरे

त्याच्या बायकोच्या डाव्या पायाच्या करंगळीवरुन
काल गेली त्याच्या मूलाची सायकल
त्याचा पिवळ्या रंगाचा शर्ट जळाला आयर्न करतांना
गेल्या महिन्यात भेटलेल्या त्याच्या मूलाला
येते आठवण माझ्या मुलाची
मी कळवलं त्याला
काहीच नाही केलं दसऱ्यालां
माझा बी.पी.व्यवस्थित वगैरे

काल रात्री
शेजारच्या डिसोझाच्या फ्लॅटमध्ये
झाली आदळआपट
सकाळी त्याच्या फ्लॅटचा दरवाजा
आदळला जोरात
सभ्यतेने कसं काय विचारावं काय झालं ?
कित्येक दिवस न भेटलेल्या डिसोझाला
आणि त्याचा 'मेल अॅड्रेस' ही माहित, नाहीए मला

## ☐ भीती

भीतीचा व्हायरस
कुरतडतोय आपलं मन
रिपिटतेय मज्येत एकच एक भसाडी जिंगल
आपले सगळे विचार करणारे हायवे जाम झालेले
एक ३६ वर्षांचा देह गुदमरुतोय मनात
उचक्यादेत जगण्याच्या मेनहोलमध्ये
आपली गाडी घुसमटून पडलेली
आणि आपण करकचून ब्रेक ऐवजी
एक्सलेटर दाबलेला

## ☐ कुणी दिला पासवर्ड रिस्टार्ट व्हायला

कुठल्यातरी क्षणी सुरुवात होते आत्महत्येची
कुठल्यातरी क्षणी आपली नेट होते डाऊन किंवा
आपण आपल्यातून डिस्कनेक्ट करुन घेतो जगाला

महाकाय आत्महत्येचा प्रोग्राम
आपल्या मेंदूत हँग होत रहातो
कितीही विचार केला विचार करण्याचा डिलीट
तरीही आपला मेंदू गुंतून पडलेला
एकाच विचारावर डोकं आपटत

आपण बुचकाळून काढतो स्वत:ला
माऊसलेल्या मनातून
झपाझप बंद करु पहातो आपण
३६ वर्षे ओपनलेली फाईल
बंद करु पहातो प्रोग्रॅम्ड हार्टबीट्स
प्रोग्रॅम्ड श्वास अन् प्रोग्रॅम्ड विचार
विचार हार्टबीटचे, जगण्याचे,
जगत जगत मरत राहण्याचे
मरत मरत जगत राहण्याचे

आपल्याला का जगायचंच्या विचारांनी
आपल्या मनाचा इनबॉक्स गच्च भरलेला

डिलीट करु पहातो आपण आपलं मन,

शरीर, नसलेला आत्मा, भयाण विचार
टपाटप पडू पाहतो आपण
अगोदरच ओव्हरलोड झालेल्या
रिसायकल बीनच्या बंद कब्रस्थानात

विचार भिनभिनत राहतात इनबॉक्समध्ये
धडका देत राहतात इनबॉक्सला
इनबॉक्समध्येच तडफडत राहतात
एस्केपताच येत नाही आपल्याला
विचारांच्या ट्राफिक जाममधून

विचारच विचार व्हायरस सारखे
ड्युप्लीकेट ट्रिप्लीकेट होत जातात
एकाच विचाराच्या हजारो कॉप्या
विखरुन विस्कटून पडलेल्या विस्कटलेल्या मनात
हऽजारो विचारांच्या हऽजारो प्रतिमा
हऽजारो आरशांच्या भुलभुल्लैया मेंदूत भणभणत
स्पेसलेस स्पेसमध्ये गुंतून

कुठल्यातरी क्षणी
मनातल्या मनात गुंतून पडलेल्या मनातलं मन
क्लीक होतं बेनाम पॉवरने
आणि फटकन आपण होतो रिस्टार्ड

आपल्या बंद बंद विंडोज
उघडत जातात सटासट
गुदमरल्या मनाला मिळू लागतो पॉवर सप्लाय

आपली बॅटरी होऊ लागते रिचार्ज
कळत मात्र नाही
ह्या कोऱ्याकरकरीत क्षणी आपल्याला
कुणी दिला पासवर्ड
रिस्टार्ट व्हायला ?

कुणी ?

## □ मी

मी हवा खातो थंड एसीची
खातो कोहीनुर बासमती राईस पिल्सबरी चपात्या
न्यूट्रेला भाज्या होममेड टोमॅटो पेस्टमध्ये शिजवलेल्या
किंवा कधी तर प्रिप्रिपेअर्ड

कधी मारतो बकना पिझाहटच्या पिझ्झावर
वडापाव नाही वाटत आता न्युट्रिशिअस
भेळपूरी पानीपुरी खावून कशाला करायचा
उगाच पोटाचा नगारा

रस्त्यावर तर कधीच नव्हतं मिळत शुद्धपाणी
म्हणून पितो सुरक्षित किनलेवाटर
वाटलचं तर कधीतरी डाएटकोक
डिपडिप चहाची येतच नाही तलफ
कॉफीने मी होतो कॉन्स्टिपेट
मी कॉन्शिअस झालोय आता
हेल्थ, वेल्थ आणि ब्रॅण्डचा
करतो वरचेवर चेकप कम्पुराईज्ड
मेंदूपासून नखापर्यंत हार्टपासून किडनीपर्यंत
थुंकीपासून स्टुलपर्यंत

मी केलयं लाईफ इन्शुअर्ड
मी काढल्यात सर्व प्रकारच्या पॉलिशा
घरदार, भांडीकुंडी, मेडिक्लेम, ऑक्सिडन्ट्ल
माझ्याकडे आहेत सर्व प्रकारची कार्ड
डेबीट, क्रेडीट, मेंबरशीप शॉपिंग पार्किंग
आय, पॅन, हेल्थ, रेशन, ड्रायव्हिंग
सेफ डिपॉझिट व्हॉल्टमध्ये बायकोने ठेवलेत दागीने
वेळ मिळेल तेव्हा मी ही
कुणाच्याही नकळत जोडतो देवाला हात

कुणाशीही नाही वैर कुणाशीही नाही वाकडं
कुणाच्याही नाही पडलोय लफड्यातं
थोडेफार आहेत इमेजचे ताण
बिचकत बिचकत जगतोय छान




## कवितेविषयी

श्रीधर तिळवे - भुमिका

मंगेश नारायणराव काळे

हेमंत दिवटे

मराठीत सध्या मनोज जोशी, सचिन केतकर, निरजा, प्रज्ञा लोखंडे, ज्ञानदा, कविता महाजन, नितीन रिंढे, भुजंग मेश्राम, अरुण काळे, प्रफुल्ल शिलेदार, संतोष पवार, महेंद्र भवरे, प्रकाश होळकर, दासु वैद्य, प्रदीप पाटील, गणेश विसपुते, रमेश इंगळे, रविंद्र इंगळे, आल्हाद भावसार, दोन्ही नितीन कुलकर्णी, सुहास एकसंबेकर, सायमन मार्टीन, प्रवीण दामले, प्रवीण बांदेकर, निरंजन उजगरे आदी अनेक कवी महत्वाची कविता लिहित आहेत.

*१. कविता म्हणजे काय असं तुम्हाला वाटतं ?*
*२. तुम्हाला अभिप्रेत असलेली कविता कोण लिहित आहे ? कणी लिहिली आहे ?*
*३. तुम्हाला आवडलेले कवी आणि ते आवडण्याची कारणे ? त्यांचा तुमच्यावर प्रभाव पडला आहे का ? पडला असल्यास त्याचे स्वरुप काय ?*
*४. कवितेने विचारसरणीशी (म्हणजे मार्क्सवाद किंवा फुले आंबेडकरवाद किंवा अध्यात्मवाद) बांधिल असावे का ? कविता समाजात परिवर्तन घडवून आणते का ? कवितेला परिवर्तनाचे हत्यार मानणे कितपत योग्य आहे असे वाटते ?*
*५. कविता ही १९८५ नंतर किंवा १९९० नंतर बदलली आणि १९९० नंतर तिने मराठी साहित्याला नवे वळण लावले इतकेच नव्हे तर १९९० ते २००० हे दशक कवितेचे दशक मानावे इतके नवे धुमारे कवितेत फुटलेत असे काहींना वाटते. तुम्हाला हे पटते का ? पटत असल्यास का ? व पटत नसल्यास का ?*
*६. कविता हा श्रेष्ठ वाङ्मयप्रकार आहे की दुय्यम वाङ्मय प्रकार? का ? कादंबरी आणि कविता यांच्या तुलनेविषयी तुम्हाला काय वाटतं? कवितेवरील समिक्षेविषयी तुम्हास काय वाटते ?*
*७. तुमच्या व्यक्तिमत्वाच्या कोणत्या घटकांचा तुमच्या कवितेवर प्रभाव आहे ? त्याचे स्वरुप काय ?*
*८. तुमच्या भोवतालच्या वातावरणानुसार तुमची कविता बदलत गेली काय ? तिच्यातील असे बदलते घटक कोणते? काही घटक स्थिर राहिले असे तुम्हास वाटते काय? ते स्थिर कां राहिले?*
*९. तुमच्या कवितेची भाषा कशी घडली ? तिच्यावर घर, शिक्षण संस्था, ऑफिस, व्यवसाय वगैरे घटकांनी आणि आधीच्या कविंच्या भाषेने काय संस्कार केले ? तुम्हाला तुमच्या कवितेची स्वयंभू भाषा सापडली आहे असे वाटते काय ? कविंनी भाषेचा रियाज केला पाहिजे का ? त्याने भाषेचा व कवितेचा रियाज कसा करावा ?*
*१०. स्वत:च्या कवितेविषयी 'हे राहून गेले' असे वाटते का ? काय राहून गेले आणि काय सापडून गेले ?*

हे सर्व कवी सर्वसाधारणपणे कवितेत बोलतात पण त्यांच्या कविते मागील पसारा समजून घेण्यासाठी त्यांना कवितेबाहेरही बोलते करणे आवश्यक आहे असे वाटले. त्यातून कविचा स्पष्ट उलगडा होईल ह्या दिशेने तो नीट विचार मांडू शकेल म्हणून दहा प्रश्नांची प्रश्नावली तयार करण्याची कल्पना पुढे आली. कवितेबरोबर या प्रश्नावलीची उत्तरेही पाठवा अशी विनंती केली.

आमची ही प्रश्नावली व कवींची उत्तरे वाचकांना आवडतील अशी आशा आहे.

इथे हेमंत दिवटे व मंगेश नारायणराव काळे ह्या दोन महत्वांच्या कवींची कविता व त्यांनी दिलेली उत्तरे आम्ही इथे देत आहोत. एरव्ही विस्कळीत वाटणारे हे दोन्ही कवी इथे नीट व स्पष्ट झालेत असे आम्हाला वाटते. हेमंत दिवटे हे प्रथमच सौष्ठवमध्ये ह्या अंकाच्या निमित्ताने आलेत.त्यांच्या अलीकडच्या कविता ह्या सौष्ठवच्या धोरणात वसत असल्याने त्या छापत आहोत.

हे सगळं कशासाठी ह्या प्रश्नाचे साधे आणि स्पष्ट उत्तर विनोबा भावे ह्यांनी स्थितप्रज्ञ दर्शन ह्या ग्रंथाच्या पान क्रमांक २ वर दिले आहे. (१९८६ ची आवृत्ती) ते म्हणतात "शास्त्र आणि कला मिळून ब्रह्मविद्या परिपूर्ण बनायची कोणत्याही विद्येचे असेच आहे. उदाहरणार्थ संगीत विद्या, संगीत विद्येचे शास्त्र शिकला पण संगीत गळ्यातून काढण्याची कला साधली नाही तर ते संगीत कोणाच्या कामी येईल? उलट पक्षी ! गळ्यात कला तर आहे पण शास्त्र ज्ञात नाही म्हणजे प्रगतीचा मार्ग खुंटला" ही प्रश्नावली म्हणजे त्या त्या कवींच्या शास्त्र ज्ञानाचा त्यांना घ्यावयास लावलेला शोध. आज अनेक कवींच्या प्रतिभेत 'कला' आहे पण 'शास्त्र' नाही त्यामुळे प्रगती नाही बहुतेक नुसते पक्षीच बनलेले. सौष्ठवचा भर त्यामुळे शास्त्रावर आहे. चौथी नवता वगैरे 'शास्त्र' आहे ते एकमेव शास्त्र आहे असा आमचा कधीच दावा नव्हता. फक्त शास्त्राची जी टवाळी चाललीये ती बंद होऊन शास्त्राकडे लक्ष जावे एवढीच इच्छा होती व आहे. ही प्रश्नावली ही त्या दिशेने केलेला प्रयत्न आहे.

*– श्रीधर तिळवे*

## हेमंत दिवटे

*हेमंत दिवटे यांचा जन्म १९६७ साली झाला. त्यांचा चौतिशीपर्यंतच्या कविता हा संग्रह प्रकाशित झालेला आहे. त्यांनी जाहिरात व्यवस्थापनाचा डिप्लोमा केलेला असून काही काळ दैनिक सामना, दै.लोकमत येथे काम केले असुन सध्या ते अपडेट ॲडव्हर्टायझिंग ॲण्ड मार्केटिंग प्रा.लि., या कंपनीत व्हाईस प्रेसिडेंट या पदावर कार्यरत आहेत. त्यांचा 'चौतिशीपर्यंतच्या कविता' ह्या संग्रहाचे इंग्रजीत भाषांतर 'व्हायरस अलर्ट' नावाने दिलीप चित्रे यांनी केले आहे. 'अभिधानंतर' या अनियतकालिकाचे ते संपादक आहेत.*

१. कविता म्हणजे काय हा प्रश्न मला जेव्हापासून कविता लिहायला लागलो तेव्हापासून पडू लागला आहे. पहिली काही वर्षे कविता म्हणजे अमूक अमूक असा भ्रम झाला होता. तेव्हा अशाच व्याख्यांच्या नादी लागून कविता मात्र वाईट लिहिली आता असे भ्रम होत नाही, आता त्यातच कविता म्हणजे काय ? जगणं म्हणजे काय ? आपण श्वास का घेतो ? आपण प्रेम का करतो ? इ.इ.इ.इ. असे प्रश्न पडतात उत्तर सापडत नाहीत. जेव्हा याची उत्तरं सापडतील तेव्हा कविता लिहिण्याला काही अर्थ उरला नसेल. विश्वाचे ब्रम्हज्ञान किंवा मोक्ष मिळाल्यावर कविता म्हणजे काय किंवा अशा अनेक अनुत्तरीत प्रश्नांची उत्तर मिळालेली असतील. मी ही या उत्तरांची वाट पहातोय.

२/३. मला जीवनवादी कविता आवडते. जीवनवादी म्हणजे जगणं आणि कविता लिहिणं यातलं अंतर संपवायचा प्रयत्न करीत असलेली वा असं अंतरचं ज्या कवितेत संपल्यासारखं वाटतं अशी कविता मला आवडते. अर्थात ठाम कोणती कविता आवडेल असं काही सांगता येणं कठीण आहे. जगण्याच्या जशा करोडो अब्जो शक्यता असतात तशा कवितेच्याही अनन्य शक्यता असतात असं मला वाटत असल्यामुळे कोणत्या प्रकारची कविता आवडते ती अशीच अभिप्रेत आहे हे सांगणं कठीण आहे. गेली अनेक वर्षे कविता, कवितेचं काम, कवितेची पारायणं करुन करुन जे काही रसायन मेंदूत घडलयं ते कविता वाचतांना कार्यरत होत असावं व प्रामाणिकपणे पौष्टिकपणे नवनिर्मिती वगैरे कविता मला आवडत असावी असे वाटते. दिलीप चित्रे, अरुण कोलटकर यांच्या अनेक कविता मला आवडतात. सर्वांत जास्त चित्रेंच्या त्यानंतर अनेक कवींच्या वेगवेगळ्या कविता आवडतात. ढहाकेंची सर्वत्र पसरलेली मुळे, ढसाळांची माणसाने आणि गोलपिठातल्या अनेक कविता, वसंत गुर्जराची गांधी मला भेटला आणि इतरही अनेक कविता आवडतात. ९० नंतरच्या कवींपैकी काही मित्रांच्या काही कविता आवडतात. अभिधानंतरच्या अंकात प्रसिद्ध झालेल्या ५० ते ६० टक्के कविता मला आवडलेल्या असतात म्हणूनच छापलेल्या असतात बाकीच्या आवडण्याच्या जवळजाणाऱ्या असतात. ज्या आवडत नाहीत त्या छापत नाही. कविता आवडण्याबद्दल तसेच कविता लिहिण्याबद्दल मी रिजीड नाही मी खूप शिथिल वाचक आहे. आणि कवितेबद्दलही 'पहिली नजरेमें हो गया है प्यार' हे सूत्र मला महत्वाचं वाटतं किंवा अशा पहिली नजरवाल्या / वाचनात आवडलेल्या कविताच अनेकदा पुढच्या अनेक वाचात अधिकाधिक आवडत गेल्या आहेत. आवडलेल्या कवितांचा सुरुवातीच्या काळात प्रभाव पडलेला आहे पण त्याकविता मी प्रसिद्धच केल्या नाहीत, काही समिक्षक उगाचच अमुक एका कवितेवर अमुक एका कवितेचा प्रभाव आहे असां जावई शोध लावून 'आनंद' मिळवत असतांत. प्रभाव असणे ही काही वाईट गोष्ट नाही. पण प्रभाव कसा टाळावा एवढं तरी चांगल्या कवीला कळत असतंच.

४. कवीची 'काही एक' विचारसरणीही असतेच. ब्लॉक असलेला माणूस किंवा कुठलीही विचारसरणी / विचारधारा किंवा विचार नसलेला माणूस कविता लिहू शकत नाही. कविता लिहितांना कुठेतरी कवी विचार सुद्धा मांडत असतो. तो सुक्ष्मपणे मांडलेला विचारही कवीची जीवनदृष्टी असते. या विचारामुळे वाचकावर रसिकावर होणारे सुक्ष्म अथवा ढोबळ परिणाम कसे असतात याबद्दल काही संशोधन झाल्याचं मी ऐकलं किंवा वाचलं नाही. कवीला कविता लिहायची असते, कवीचं काम तेचं त्यातून परिवर्तन वगैरे होतं किंवा नाही हा समाजशास्त्रज्ञांनी रिसर्च करावा असा विषय आहे. दुर्दैवाने आपल्याकडे असे समाजशास्त्रज्ञ नसल्यामुळे असे प्रश्न कवीलाच विचारले जातात व कवींनी दिलेल्या उत्तराने वाचकाचं समाधान होत नाही. कारण एखादी कविता लिहितांना कवीने जगवलेली प्रचंड ऊर्जा कवितेत उतरली की कवी पून्हा नव्या ऊर्जेच्या शोधात नकळत सुरुवात करतो अर्थात नव्या लिहिलेल्या कवितेतून मोकळं होवून दुसऱ्या कवितेच्या नादी लागणं कधी संपतं हेही अद्याप कुणी शोधून काढलं नाही, त्यामुळे ह्याही बाबतीत कुठलाही निष्कर्ष मी देवू शकणार नाही. कवितेच्या समिक्षकांनी कवितेकडे बघण्याचा त्यांचा दृष्टीकोन बदलून नीट केला किंवा पुस्तकी पतंग उडविण्यापेक्षा नव्या-नव्या रीतीने कवितेकडे

पहायला / विचार करायला लागले तर येत्या काही वर्षात आपल्याला वैज्ञानिकदृष्टया कवितेची परिवर्तनाची ताकद किती? ती कुठल्या प्रकारच्या माणसावर कुठल्या प्रकारचा परिणाम करते ? कुठल्या कवितेने समाजातील भ्रष्टाचार / भेद / यातना / दुःख / भुक किती कमी झाली ते कळू शकेल. कविता परिवर्तनाचे साधन जरी नसली तरी चांगली कविता तिच्या वाचकाला जो सुक्ष्म आनंद / विचार / सुख वगैरे देते त्या सुक्ष्म आनंद / विचार /सुखाने वाचकाच्या मनात जो काही भावनांची निर्मिती होते त्यातून मंद-अतिमंद गतीने परिवर्तन हे होतचं असते. एखाद्या चांगल्या कवितेने माझा अर्धा-एक तास जरी 'वेगळा' गेला. प्रेरक, आनंददायी, सुखदायी वगैरे वगैरे गेला तरी माझ्यात घडणारी क्रिया मला एक बळ देते. त्याबळानेच आतापर्यंत मी चांगला माणूस म्हणून माहित आहे. हेच एक सुत्र आहे ज्यामुळे अवघ्या महाराष्ट्रातील कवींशी जोडला गेलोय व परिवर्तन घडविण्याचा प्रयत्न करतोय. हा विश्वास (स्वतःचा व इतरांच्या) कवितेनेच मला दिला आहे.

५. १९९० नंतर मराठी कवितेत अमुलाग्र बदल झाला आहे. १९९० ते २००० हे दशक कवितेचे दशक मानावे इतके नवे धुमारे फुटलेत असे वाटणारा आणि सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न करणारा अशाच दृष्टीकोनातून माझ्याकडे 'अभिधानंतर' चा संपादक म्हणून पाहिले जाते. १९९० नंतर केबलक्रांती, इंटरनेट, सॅटेलाईट, टिव्ही, मोबाईल, संगणक वगैरे मुळे झालेले जगण्यातले बदल मी अनेकदा अभिधानंतरच्या संपादकीयातून मांडले आहेत. उदाहरण म्हणून दिवाळी २००३ च्या अंकातील अभिधानंतरच्या संपादकीयातील काही भाग पून्हा एकदा मांडतो. तो असा -

८० च्या दशकाच्या शेवटी सुरु झालेली 'केबल क्रांती' ९० च्या दशकात पूर्णपणे यशस्वी झालेली आपण पाहिली आहे. 'केबल' च्या अगोदर 'एंटरटेनमेन्ट' ची साधनं खूपच कमी होती. रेडिओ, दूरदर्शनचा काही तासांचा खेळ, व्हिडीओसेंटर, तुरळक तमाशा, नाटकं. घरबसल्या तर फक्त रेडिओ व टिव्ही (कृष्णधवल), एशियाडच्या जवळपास रंगीत टी.व्ही. एवढंच आपल्यासाठी उपलब्ध होतं. गावखेड्यात तर हेही नसायच. ९० च्या दशकात टी.व्ही. 'लक्झरी' न राहता जगण्याचा अविभाज्य अंग बनत गेला. केबलमध्ये आमुलाग्र बदल होवून असंख्य चॅनल्स् आपल्याला उपलब्ध झाले. आर्थिकदृष्ट्या न परवडणाऱ्या नव्या टेक्नॉलॉजीचा वापर करायचा म्हणून ऑपरेटर एकत्र आले. त्यात हिंदुजा सिटीकेबल इत्यादी मोठे उद्योग केबल व्यवसायाची इतर देशातील प्रगती पाहून या व्यवसायात घुसले. यामुळे आपलं घर बदललं, आपलं जगणं बदललं. या सगळ्याला टी.व्ही. व सॅटेलाईट टी.व्ही. कारणीभूत आहे. हे कोणालाही पटायला जड जावू नये. सॅटेलाईट चॅनल बरोबर इंटरनेट टेक्नॉलॉजी भारतात घुसून लवकरच बुडाली. भविष्यात इंटरनेट आपल्या जगण्यात धुमाकूळ घालणार हे नक्की. याच दशकात प्रिंटीग टेक्नॉलॉजी, मोबाईल, पेजर, व्हीडीओ फोन, व्हीडीओ कॉन्फरन्ससिंग, व्हीडीओ फोन असे अनेक दळणवळणाचे साधन आहेत. आणि अनेकांच्या जगण्याचे भाग बनत गेले. या सगळ्या सुविधा आपल्या दिमतीला आल्यामुळे आपण खऱ्या अर्थाने गोबल झालो आहोत. मध्यंतरी काही लोकांनी जागतिकीकरणाची सुरुवात वॉस्को-द-गामा आल्यापासून झाली असल्याचे सांगून टाकले. लोकांनीही काहीही विचार न करता त्यावर विश्वास टाकला असं आपल्याकडे सतत घडत आलं आहे. यानंतर जागतिकीकरणावर अनेक विचार प्रगट होत आहेतच. १९९० च्या दशकात मात्र आपण इतरांसकट जागतिकीकरणाचे पद्धतशीर घटक झालो आहोत असं म्हणता येईल. तुम्ही किंवा मी केलेल्या कुठल्याही गोष्टीचा जगावर परिणाम होणार आहे. एवढं ज्यांना ज्यांना कमी अधिक प्रमाणात वाटायला लागलं आहे ते ग्लोबल झाले आहेत.

हे सगळं ९० च्या दशकात घडत गेलंय. दहा-बारा वर्षांपूर्वीची मुंबई आणि आताची मुंबई आणि तीचं होऊ घातलेलं शांघाय एवढ्या गोष्टीसमोर ठेवल्या की जागतिकीकरण म्हणजे झपाट्याने सॅटेलाईट वेगाने सतत बदलत जाणारा एक मोठा पट आहे, हे लक्षात येईल. ८० च्या दशकात रस्त्यावर दिसणारी गर्दी आणि आज रस्त्यावर दिसणारी गर्दी मला प्रचंड वेगळी वाटतेय. १९८० पर्यंतचा ब्लॅक ॲण्ड व्हाईट भारत १९९० मध्ये मल्टीकलर, मल्टीकल्चरल झाला. रस्त्यावरचे हेडिंग्ज् बदललेत. छान झालेयेत, बिल्डिंगी बदलल्यात, घरातले व बाहेरचे ब्रॅन्ड बदललेत, आपली भाषा बदलून गेलीय, लक्झरीचं गरजेत रुपांतर झालंय. माणसाचा 'कन्झ्युमर' झालाय. आपल्या हातात आता काही राहिलं नाही, आपण हतबल झालोत. नव्वदच्या दशकात आपण नखशिखांत बदललोय.

पण आपल्या नकळत जागतिकीकरणाचे 'वाडी' तल्या माणसावरसुद्धा परिणाम होताहेत. काळ्या सपाट दगडाने पाठ घासणारा आदिवासी पाड्यातला चंद्रया आता 'लाईफबॉय' ने

आंघोळ करतोय. त्याचा लाकडं विकायचा धंदा आता बंद झालाय तो आता वाण्याकडे हमाली करतोय. चंद्रयाची बायको मोळी विकायची, मध विकायची, नंतर दारु प्यायची, ती आता गणपतरावांच्या शेतावर काम करते. आठवड्याच्या बाजारातून एक-एक रुपयाला मिळणाऱ्या 'सशे' मधून दुधपावडर, साबण, बिस्किटं घेऊन जाते. माणसं ब्रँड घेऊन सर्वदूर पसरली आहेत आणि हे सगळं एकाच दशकात घडलं, हे महत्वाचं. आता हे सर्व पसरताना 'हिन्दुत्ववाद' ही तेवढाच वेगाने सर्वदूर पसरलाय, बुवाबाजीही ग्लोबल झालीय. वेग फक्त चांगल्याच गोष्टींचा वाढला नाही, वाईट गोष्टींचाही वाढला. 'कमालीचा माणूसघाणे' पणा क्रूरता, धर्मभेद आदी अनेक गोष्टींबरोबरच प्रतिक्रिया म्हणून दंगली, बॉम्बस्फोट, खून, दरोडे, चोऱ्या-भुरट्या ते नेटपर्यंत, लैंगिक क्रूरता, स्त्रियांच्या प्रगतीबरोबरच गल्लोगल्लीच्या डान्सबार, ब्रॉथेलमध्ये स्त्रियांची कुतरओढ, संस्कृती टिकविण्यासाठी व नव्या संस्कृतीचा नागरिक म्हणून भूषवण्यासाठी चढाओढ जोरात चालू आहे.

६. कविता श्रेष्ठ की कादंबरी श्रेष्ठ अशी तुलना करणे खरे म्हटले तर चुकीचे आहे. कविता किंवा कादंबरी चांगली किंवा वाईट असंच मी पहात असतो. मराठी वाङ्मय परंपरेचा जर खोलात जावून विचार केला तर मराठी भाषेला आणि कवितेला ८०० वर्षांची दीर्घ परंपरा आहे हे आपल्या लक्षात येईल व कविता गेली आठशे वर्षे मराठीला समृद्ध करते आहे. कवितेमध्ये तत्कालीन समाजाचं चित्र स्पष्ट होतांना आपण अनभवू शकतो. मराठी कविता वाचून मराठी माणसाच्या अनेक अंगांचा उदा. राजकिय, सामाजिक, सांस्कृतिक, भौगोलिक अंदाज किंवा ठाम सत्य किंवा इतिहास तपासता येईल. मराठी कादंबरीला तशी फार मोठी परंपरा नाही म्हणून व मराठी कादंबरी समृद्ध नसल्यामुळे मराठी भाषेचा विचार करता मराठी कविता केव्हाही श्रेष्ठच ठरते.

मराठी कवितेची समिक्षा मात्र जटीलतेत व प्राध्यापकी भाषेत अडकल्यामुळे निकृष्ट ठरावी इतकी वाईट आहे. कवितेच्या समिक्षेतून वाचकाला एखाद्या कवितेत काय-काय दडलंय, प्रस्तुत कवितेकडे विविध बाजूंनी पाहिल्यास काय-काय वाटते ? वगैरे प्रश्नाची उकल होण्यापेक्षा मराठी समिक्षेमुळे कविता गहन होत गेली. सामान्य वाचकाच्या ती पूर्वी खूप जवळ होती, समिक्षकांनी तिला सामान्यातून काढून तिला अल्पसंख्यांक केली आहे. ज्या रितीने कवितेचा विचार आपल्याकडे व इतरही भाषांमध्ये (मराठी समिक्षकांवरचा युरो-अमेरिकन वा तत्सम प्रभाव) केला जातो त्यारितीनेच जर विचार होत गेला तर कविता अल्पसंख्याकांतील अल्पसंख्यांक होईल. मराठी भाषेतल्या स्वत:च्या प्रेमात पडलेल्या, अहंकाराने भरलेल्या समिक्षकांच्या तावडीतून कविता सूटो व तिला पून्हा मोकळा श्वास घ्यायला मिळो अशी मी प्रार्थना करतो. सुदैवाने नव्याने समिक्षा लिहिणाऱ्या काही मंडळींमध्ये हे भान यायला लागले आहे, अर्थात पूर्ण मोकळेपणा त्यांच्यात आलेला जरी नसला तरी येत्या काळात मराठी समिक्षा व पर्यायाने कवितेची समिक्षा तिचं खरं रुप घेईल असे वाटते. कविता अशी असावी असा एक मापदंड मनात घेऊनच सर्व प्रकारच्या कवितेकडे पाहिलं जातं त्यामुळे हा गोंधळ होतो. कवितेच्या अनेक शक्यता लक्षात घेऊन जर कवितेचा विचार केला आणि समिक्षा केली तरच कवितेची चांगली समिक्षा झाली असं म्हणता येईल. दुसरं असं की, काही कविसमिक्षकांच्या जोड्या लागलेल्या आहेत ते लोक त्या कविंच्या आजूबाजूच्या इतर लोकांना ढुंकूनही पहायला तयार नाहीत हेही वाईट आहे. प्राध्यापकी केल्यावर जोडधंदा म्हणून अनेकांनी 'समिक्षा' ह्या महत्वाच्या गोष्टीकडे पाहिलं, समिक्षा कले इतकीच महत्वाची आहे किंवा त्याहीपेक्षा महत्वाची आहे हे गांभिर्य जोपर्यंत समिक्षकांमध्ये येत नाही व आपण जे करतोय ते काय महान व जबाबदारीने करायला पाहिजे हे जोपर्यंत ध्यानात येत नाही तोपर्यंत समिक्षा बदलणार नाही. समिक्षेची भाषा सोपी असावी हा मुलभूत नियमही समिक्षक पाळत नाहीत म्हणून मोठी गफलत होते. अर्थात सर्वच समिक्षक असे आहेत असे नाही. परंतू २% चांगले लोक ९८% वाईट लोकांच्या आड लपले जातात आणि अशा अल्पसंख्यांकांना कुणी मनावर घेत नाही. श्रीधर तिळवेंकडे समिक्षक म्हणून अनेक चांगले गुण आहेत परंतू घाईघाईत, संपूर्ण विषयाचा उलगडा न होवू देता / करता, स्वत:च्या पलीकडे विचार करण्याचं स्वातंत्र्य न घेतल्यामुळे व याद्या केल्यामुळे श्रीधरची समिक्षा 'घिसाडघाईची समिक्षा' वाटत रहाते त्यामुळे श्रीधरच्या समिक्षेला टिकेला सामोरं जायला लागतं अन्यथा श्रीधर तिळवे मराठीतील एक अव्वल विचारवंत व समिक्षक बनू शकतो. ते बनण्यासाठी लागणारं आत्मभान व ज्ञान त्याच्याकडे नक्कीच आहे, अनेकांनी धसका घ्यावा अशी त्याची विचार करण्याची क्षमता आहे, श्रीधरला ह्या निमित्ताने मराठी कवितेच्या व भाषेच्या भल्यासाठी अजून थोडा बदल हे मी सांगू इच्छितो.

७. माझं जवळपास सगळंच व्यक्तिमत्व माझ्या कवितेत आलं आहे. माझ्या जगण्यात झालेले सुक्ष्म व मोठे बदल. माझा स्वभाव,

राहणीमान, संवाद साधनं, प्रचंड मैत्री करणं, निव्यार्ज प्रेम करणं, मौजमजा करणं, चिंता करनं, विनाकारण चिंता करणं, भिती, मला न पटणाऱ्या गोष्टींचा तिथल्या तिथे सोक्षमोक्ष लावणं, विवेकानंही विचार करणं, जमेल तेवढं चांगलं करणं, धुर्त असणं, मला बनवू शकणार कुणी नाही असा अहंकार असणं, माझं स्वत:वरचं व इतरांवरचं प्रेम, द्वेष, जाती-धर्म वगैरे भेदांबद्दल तिरस्कार अशा अनेक गोष्टी माझ्या कवितेत ठिकठिकाणी आल्या आहेत. मला वाटणारं माणसांबद्दलचं प्रेम व देशाबद्दलचं प्रेम मात्र अजून माझ्या कवितेत हवं तसं मी व्यक्त करु शकलो नाही. 'जन गण मन' ऐकतांना शिस्तीत उभं राहण्याचे व राष्ट्रगीताचा व अशा प्रकारच्या अनेक भावनांचा माझ्या कवितेत अजूनही मागमूस नाही हे मला थोडं खटकतं. हे मला व्यक्त करायला अजून मला हवे तसे शब्द मिळाले नाहीत.

८. भोवतालानुसार माझी कविता सततच बदलत गेली आहे. पुढचा विचार करण्याची आपसुकच सवय जडल्यामुळे कवितेच्या अनेक शक्यतांचाही मी विचार करीत असतोच जगणं कितीही बदललं तरी माझे पाय अजूनही जमीनीवर आहेत व ते तसे राहतीलच असा ठाम विश्वास मला वाटतो. मला चांगला माणूस म्हणून जगायचं आणि मरायचं आहे. आणि असं करण्यासाठी प्रयत्न सोडून काहीच करावं लागत नाही. तो अतोनात प्रयत्न मी माझ्यापरीने करतोय. वातावरण कितीही बदललं तरी माणूसकी व विचाराचं स्वातंत्र्य कसं अबाधित राहील याचा मी विचार करीत असतो. जगण्याशी तुम्ही प्रामाणिक राहिलात की कवितेत प्रामाणिकपणा येतो, माणूस किंवा कविता लिहिणारा माणूस जगतांना खोटा जगला की त्याची कविता सुद्धा खोटीच निपजते. अशी खोटी कविता लिहिणारे अनेक खोटे खोट्या लोकांनी मोठे केलेले आहेत. जगण्यात चारित्र्य जसं असेल तसचं ते कवितेतही उतरतं. तुम्ही जगाशी खोटं बोलू शकाल स्वत:शी नाही त्यामुळेच कवितेशी तर नाहीच नाही.

कवितेची भाषा जगण्यातून येते. तशीच ती आली तरच कविता समकालीन वाटते अन्यथा नाही. जमेल तेव्हढ वाचन, चर्चा, कवितेसाठी वाद करत करत, जगत जगतच मी घडलो. माझी कविता वाचून मी कळू शकतो, अपार कळू शकतो आणि असं असणं मला महत्वाचं वाटत आलं आहे. अभिधा व अभिधानंतरचं संपादन करणं किंवा ते काढणं या गोष्टीमूळे माझं वैयक्तिक व कवितिक आयुष्य समृद्ध झालं आहे. त्यामुळे हे सर्व करतांना काहीही करावं लागलं तरी मी करत आलोय. भाषा मला सापडलीय हे नक्की, मी काय करतोय हे मला तरी नक्की माहिती आणि स्वत:चं वेगळेपण टिकविण्यासाठी काय-काय करावं लागतं याचीही जाणिव मला आहे. स्वत:चं आयुष्य कसं जगायचं ते ज्याच्या-त्याच्यावर अवलंबून आहे. काय करुन कविता समृद्ध होईल तर त्याचं नेमकं उत्तर देणं मी टाळतोय. कारण कुठलं औषध कुणाला किती व केव्हा घेतलं की बरं वाटतं हा त्या-त्या माणसागणिक बदलणारी गोष्ट आहे. ती ज्याची त्यानी करीत रहावी. शॉर्टकट घेण्याची सवय चांगली नाही. मी शॉर्टकट सांगून प्रत्येकजण नियोजित स्थळी पोहोचेल असंही नाही. प्रत्येकाने ज्याचे-त्याचे मार्ग काढावेत. अनेकांना शार्टकटने जायला आवडतं असे लोक लवकर पोहोचण्याऐवजी सपशेल कोसळलेले मी पाहिले आहेत. मलाही अजून वरचं चालायचयं मी ही रस्त्यावर आहे येत्या वळणानंतर कुठल्या बाजूला जायचं हे माझंही ठरलेलं नाही. तिथे पोहोचल्यावर मी ते ठरवीन तोपर्यंत काही सांगण व्यवहार्य होणार नाही. एक नक्की खूप कष्ट करायची सवय असल्याने व प्रचंड विचार करीत असल्यामुळे मला माझा रस्ता सापडलाय असं वाटतं. अर्ध्यावर आलोय. अजून अर्ध बाकी आहे. आलोय तितकाबरोबर मात्र आलोय.

## मंगेश नारायणराव काळे

*मंगेश नारायणराव काळे यांचा जन्म १९६६ साली झाला. त्यांनी पुणे विद्यापीठातून हिंदी या विषयात, तर डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातून संज्ञापन व पत्रकारिता या विषयात पदव्युत्तर शिक्षण घेतले. काही काळ औरंगाबाद येथे वर्तमानपत्रात नोकरी केल्यानंतर सध्या खान्देशातील जळगाव येथे मुद्रण व प्रकाशन व्यवसायात स्थिर.- 'मंगेश नारायणराव काळेची कविता' हा कविता संग्रह प्रकाशित. 'शक्तिपाताचे सूत्र' हा दुसरा संग्रह लोकवाङ्मय गृहाकडून प्रकाशित होत आहे.*

१. कविता म्हणजे काय ? असा प्रश्न मला कधीही पडलेला नाही व पुढेही तशी शक्यता नाही. याचे कारण अगदी साधे आहे. म्हणजे मी जेव्हा कविता लिहायला लागलो तेव्हापासून मला व्यक्त होण्यासाठी सगळ्यात जवळचे व माझ्या दृष्टीने अगदी सहज असे माध्यम कविता आहे, हे समजले आहे.

चांगली कविता कोणती ? असा प्रश्न मात्र मला सातत्याने पडत आला आहे. व त्यासाठी मी माझ्या वाचनातून याचे उत्तर शोधण्याचा नेहमीच प्रयत्न करत आलो आहे. गेल्या २० वर्षाच्या कालखंडात माझ्या वाचनातून याचे उत्तर मला निश्चित मिळाले आहे.

तरीही श्रीधरला अपेक्षित असलेले उत्तर काहीसे असे असू शकते. मला आनंद देणारी सर्वात मोठी गोष्ट कविता लिहिणे आणि वाचणे आहे. जी कविता जगणे अधिक समृद्ध करते. जी कविता लिहून झाल्यावर स्खलनानंतरचा आनंद देते, जी कविता जगण्याच्या कक्षा अधिक रुंदावते, जी कविता माझे माणूसपण टिकवून ठेवते ती कविता. ही यादी बरीच वाढविता येऊ शकते.

एखादे चांगले चित्र, एखादा चांगला सिनेमा, एखादे चांगले पुस्तक, एखादी व्यक्ति ही एक सर्वांग सुंदर कविता असू शकते. अशा कविता मला सातत्याने भेटत आल्या आहेत.

२. मला अभिप्रेत असलेली कविता मी लिहितो आहे असे साधे सरळ याचे उत्तर होईल. कारण मला अभिप्रेत असलेली कविता कशी असावी हे मी एक कवी म्हणून निश्चितच ठरवलेले असते.

मात्र हा प्रश्न समकालीन पातळीवर किंवा अगोदरच्या कवींबाबत असेल तर त्याचे उत्तर वेगळे असेल. माझ्या पूर्वसूरीच्या कविंमध्ये अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, विलास सारंग, नामदेव ढसाळ, मनोहर ओक, विष्णू खरे, चंद्रकांत देवताले अशी कितीतरी नावं घेता येऊ शकतील. तर समकालीनांमध्ये नितीन कुलकर्णी, नितीन रिन्धे, सलील वाघ, वर्जेश सोळंकी, मनोज पाठक अशी काही नावं घेता येतील. पण त्याचबरोबर मला अभिप्रेत नसलेली मात्र महत्वाची असलेली कविता लिहिणाऱ्यांमध्ये ग्रेस, महानोर, वसंत आबाजी डहाके, तुळशी परब, सतीश काळसेकर, मंगेश डबराल, अनुराधा पाटील, मल्लिका अमरशेख, भुजंग मेश्राम, हेमंत दिवटे, श्रीधर तिळवे, रमेश इंगळे उत्रादकर, सचिन केतकर, मन्या जोशी, रविंद्र इंगळे, प्रविण बांदेकर, अरुण काळे, प्रफुल्ल शिलेदार, दासु वैद्य अशी अनेक नांवे घेता येतील.

३. कवी आवडण्यासाठी काही कारणं असावी लागतात असे मला वाटत नाही. कारण प्रत्येक कविचे भावविश्व त्याची निर्मिती प्रक्रिया, त्याचे भाषेवरचे प्रभुत्व अशा बऱ्याच गोष्टी, बऱ्याच कवींमध्ये असू शकतात. विशिष्ट एका कारणासाठी हा कवी आवडतो असे कधी होत नाही. दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, नामदेव ढसाळ, मनोहर ओक, विलास सारंग यांच्या कविता सरसकट आवडतात. यामागे विशिष्ट असं काही कारण मला देता येणार नाही.

मात्र या कवींची व्यक्त होण्याची पद्धत, त्यांच्या कवितेची भाषा. मला जवळची वाटते. माझ्या समकालीनांमध्ये नितीन कुलकर्णीची कविता आवडते. बऱ्याचदा आपल्याला हे पकडता आलं नाही हे ही लक्षात येतं.

राहिला प्रभावाचा प्रश्न तर तो निश्चितच पडतो. फार मोठ्या प्रमाणावर पडतो. बऱ्याचदा हा प्रभाव आपलं लिहिणंच खुंटवून टाकतो. मला वाटतं या प्रभावाला पचवून कविता लिहिता यायला हवी. एखादा कवी असेल, कादंबरीकार, नाटककार, चित्रकार असेल, एखादा सिनेमा दिग्दर्शक असेल किंवा एखादा सामान्य माणूस असेल. या सगळ्यांचा प्रभाव माझ्या जगण्यावर अतोनात झाला आहे. प्रश्न एवढाच उरतो मी प्रभावातून जे स्विकारतो ते जसेच्या तसे प्रेझेंट करतो आहे की यातून मला स्वत:ला व्यक्त होण्यासाठी मिळालेल्या बळाचा वापर माझ्या व्यक्त होण्यासाठी होतो आहे. आणि याबाबतीत कवीने स्वत: कोणतेही विधान करण्याची गरज मला वाटत नाही. हे काम समिक्षकांना करु द्यावे. ते अगदी चूकीच्या पद्धतीने होत असले तरी किंवा थेट वाचकांना तरी.

•••

प्रभाव पडला असल्यास तो कसा याबाबत एक अनुभव सांगता येईल. विष्णू खरेंच्या कविता अनुभवाचे असंख्य तुकडे आपल्या समोर मांडत जातात. म्हणजे त्यांची कविता वाचतांना संपूर्ण सावध असावं लागतं. बऱ्याचदा ते स्पष्टपणे जाणवत नाही. आणि आपण अस्वस्थच राहतो. हे अस्वस्थपण मला कवी म्हणून बळं देणारं ठरलं आहे. चित्रे, कोलटकर, ओक , ढसाळ यांच्या कविता मी नुस्त्या वाचतच नाही तर ती कविता कशी सुचली असेल ? अशाच पद्धतीत कां लिहिली असेल ? या कवितेची मांडणी अशीच कां ? असे असंख्य प्रश्नांचा शोधही मी ती कविता वाचून झाल्यावर पुन्हा पून्हा वाचून घेत राहतो. अनेक चित्रांच्या, सिनेमा, कादंबरी, व्यक्तींच्या बाबतीत असं बऱ्याचदा घडतं आणि अनेक प्रश्न निर्माण होतात. हे प्रश्न व त्यांची उत्तरं म्हणजेच माझ्यावर पडलेला प्रभाव असावा. तो माझ्या कवितेत दिसत असेल तर कवी म्हणून तो प्रभाव टाळण्यासाठी मी अपयशी ठरलो असा होतो.

४. प्रत्येक माणसाची स्वत:ची एक विचारसरणीच असतेच. मग तो कवी असो, एखादा साधा मजूर, दुकानदार, शिक्षक काहीही असो. विचारसरणी नाही असा माणूस असूच शकत नाही. आणि विचारसरणी आहे. हे स्विकारल्यावर तो त्याला बांधील असतो असे साधे सरळ सुत्र त्यामागे आहे. त्यामुळे विचारसरणीशी बांधील कवीने असावेच. मग ती विचारसरणी मार्क्सवादी असो, फुले आंबेडकरवादी, अध्यात्मिक किंवा अजून काही.

राहिला प्रश्न परिवर्तनाचा तर त्याचे उत्तर फारच सुक्ष्म असे आहे. मराठीपुरता विचार केला तरी मुळातच कविता किती लोक वाचतात हा महत्वाचा प्रश्न आहे.

गंभीर कवितेचा वाचक मराठीत एक हजारापेक्षा जास्त नाही. हे ठामपणे सांगता यावी अशी परिस्थिती आहे आणि जर वाचकच हजाराच्या घरात असेल तर कोट्यावधींची लोकसंख्या असलेल्या प्रदेशात त्यामुळे कितपत परिवर्तन होते हा संशोधनाचा विषय ठरावा. मात्र एक नक्की, कवितेत ती ताकद आहे. प्रश्न एवढाच आहे की, त्या कवितेला तेवढाच सेंसेटिव्ह समाज मिळाला आहे का ? एक कवी म्हणून मला स्वत:च्या बाबतीत कवितेचे परिवर्तनाचे कार्य मान्य आहे. मी कवी असल्याची जाणीव मला चुकीचे मार्ग निवडू देत नाही हा माझा स्वानुभव आहे. उदा.मी एका वृत्तपत्राचा संपादक म्हणून काम करीत असतांना अनेकदा आलेले मोहाचे क्षण मी केवळ कवी असल्याकारणाने सहज टाळू शकलो आहे. मला वाटते एवढे कां होईना परिवर्तन पुरेसे आहे. आणि याहीपुढे जावून ज्यांना कविता 'हत्यार' वगैरे वाटत असेल त्याला आपली काही एक हरकत असण्याचे कारण नाही. मात्र सद्याचा कालखंड आणि समाजाची मानसिकता पहाता एखाद्या कवितेनं समाज जागा होईल किंवा सामाजिक परीवर्तन घडून येईल म्हणून कवितेला 'हत्यार' समजणं हे बाळबोधपणाचं ठरेल.

५. कविता अशी कुठल्याही कालखंडानुसार बदलते असे मला वाटत नाही. फारतर त्या त्या कालखंडाच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक वातावरणाचा परिणाम होऊन कवितेची भाषा, कवितेची अभिव्यक्ती बदलू शकते. म्हणून समूळ कविताच या कालखंडात बदलली असे विधान करणे धाडसाचे ठरेल. मुळात कवितेची व्याप्ती अफाट आहे. आठशे वर्षांची प्रदीर्घ परंपरा असलेल्या कवितेत कित्येक महत्वाच्या कवींनी मराठी कविता अधिकाधिक समृद्ध केली आहे. मात्र ती बदललेली नाही. प्रत्येक नवीन कालखंडात तिच्यात काहीतरी अधिकचे सामावत असते तर काही गळून पडते. हे अगदी निसर्ग नियमांसारखे आहे. 'बहर येणे' आणि 'पानगळ होणे' या प्रकारातले काहीसे घडत असावे. बऱ्याचदा या कालखंडात कविता बदलली असे म्हणण्यामागेही आपल्या सोयीचेच असे काहीतरी असावे. ते कवितेला संकुचित करणारे आहे.

मात्र त्याचबरोबर जागतिकीकरणाच्या आणि त्यातून निर्माण झालेल्या कोलहालाच्या काळात जर आपण अजूनही बोरकर, पाडगांवकरांच्या गळ्यात गळा घालून भावगीते आणि भाव कविता लिहत असू तर ती स्वत:ची आणि इतरांचीही फसवणूक ठरेल.

१९९० नंतरच्या कवितेत काही नवीन गोष्टी ठळकपणे आल्या हे मात्र निश्चितपणे म्हणता येईल. म्हणजे जागतिकीकरणाचा थेट परिणाम या कालखंडात अधोरेखित होऊ लागल्याने, याच कालखंडात इंटरनेट, केबल वाहिन्यांमुळे व आधुनिक तंत्रज्ञानामुळे आलेल्या वेगवेगळ्या सुविधांमुळे इथले प्रतिमाविश्व मोठ्या प्रमाणावर बदलले आहे. १९९० नंतरच्या कवितेत मोबाईल, संगणक अशा अनेक अपरिचित असलेल्या प्रतिमा आल्या. ज्यापूर्वी अस्तित्वातही नव्हत्या. या नव्या प्रतिमाविश्वाचा झालेला परिणाम या काळातील कवितेत उमटत असेल तर ती कविता अधिक सशक्त झाली असे म्हणता येऊ शकेल. मात्र इंटरनेट, मोबाईल, कॉम्प्युटर सारख्या प्रतिमांची भाराभर यादी म्हणजे कविता

किंवा जाणीवपूर्वक इंग्रजी शब्दांची कवितेत उतरंड रचणे किंवा बोल्डनेस दाखविण्यासाठी अश्लील प्रतिमांचा अनावश्यक वापर करणेही असेही मध्यानदा पडतांना दिसते तेही वाईटच आहे. सुदैवाने मुठभर का होईना काही कवी या कालखंडात सशक्त कविता लिहित आहेत. मग ती कविता असो की अभिव्यक्तीचं कुठलंही माध्यम असो. या कालखंडात झालेल्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, भाषिक बदलाची नोंद नव्याने लिहिणाऱ्यांनी घेतली आहे. राहिला वळण लावण्याचाच प्रश्न तर ते काम नव्याने सुरु झालं आहे. नव्वदनंतरच्या पिढीने साठोत्तरी कविता पुढे नेण्याचा प्रयत्न याच कालखंडात सुरु केला आहे.

साठोत्तरी पिढीने जे भक्कम काम मराठीत कवितेत करुन ठेवलं आहे ते पुढे नेण्याऐवजी ते झाकण्याचा किंवा त्यावर माती टाकण्याचाच जास्त प्रकार ६० नंतरच्या दशकांमध्ये झाल्याचे दिसून येते. उदाहरण द्यायचे झाले तर मध्यंतरी आलेल्या 'दशकातील कविता'सारखे प्रयोग याच मानसिकतेतून झाले आहे. विशेषत: जाणीवपूर्वक हे काही लोकांनी घडवून आणले होते. सुदैवाने ९० नंतरच्या दशकात लिहू लागलेल्या कविंना हे भान चांगल पाळलं आहे. त्यात १९८५ किंवा १९९० असे सोईचे कालखंड काही लोक स्वत:साठी करून घेत असतील तर ती त्यांची अत्यंत खाजगी बाब ठरावी. मात्र एक निश्चित, 'साठोत्तरी' शब्दाला जसा एक स्वतंत्र अर्थ त्या कालखंडातल्या महत्वाच्या कवींनी प्राप्त करून दिला. तसा 'नव्वोदोत्तरी'ला प्राप्त होऊ शकेल इतके चांगले वातावरण सद्यस्थितीत मराठी कवितेत आहे.

६. कविता श्रेष्ठ आणि कादंबरी कनिष्ठ असे श्रेष्ठ-कनिष्ठ प्रकार असतात असे मला वाटत नाही. मग मराठी कवितेला ८०० वर्षांची परंपरा आहे आणि ती कादंबरीला नाही म्हणून कविता श्रेष्ठ आणि कादंबरी कनिष्ठ असे प्राध्यापकीय निष्कर्ष काढण्यात काहीही हशील नाही. सुदैवाने मराठीत श्रेष्ठ कवितेबरोबर श्रेष्ठ कादंबरी लेखनही झालेले आहे. भाऊ पाध्ये, भालचंद्र नेमाडे, त्र्यं.वि.सरदेशमुख, विलास सारंग, किरण नगरकर, श्याम मनोहर इ.सारख्या लेखकांनी ते सिद्ध केलं आहे.

राहिला प्रश्न कवितेवरील समिक्षेचा तर ते आपल्या मराठीत फारचं ग्रेट प्रकरण आहे. याचा अर्थ मराठीत चांगली समिक्षा लिहून झालीच नाही असा नाही. मात्र चांगल्या समिक्षेची टंचाई निराशा करणारी आहे. मराठीतील नामवंत समिक्षक अजूनही बालकवींच्या हिरव्या गालीच्याच्या बाहेर पडायला तयार नाहीत. आणि काहींना लिहिण्याची चांगली व्यासपीठं उपलब्ध आहेत त्यांनी आपली मुंबैकर-पुणेकर करून आपले लिखाण करण्यात धन्यता मानली आहे. नव्या पिढीत दा.गो.काळे, एकनाथ पगार, श्रीधर तिळवे, रविंद्र इंगळे चावरेकर, नितीन रिन्दे, सचिन केतकर, अभिजित देशपांडे सारखी काही नावे घेता येतील. मात्र यातील काहींची समिक्षा खाजगी संबंधातच अडकून पडली आहे की काय ? असा प्रश्न पडावा इतपत खाजगी झाली आहे.

७. कविची कविता हे त्याचे आत्मचरित्र असते हे मानणाऱ्यांपैकी मी एक आहे. त्यामुळे कवीच्या व्यक्तिमत्वाचा काही घटकांचाच नाही तर त्याच्या एकूण व्यक्तिमत्वाचाच परिणाम त्याच्या कवितेत दिसून येतो, असे माझे स्वत:चे ठाम मत आहे.

मी कसा जगतो ? माझा समाजाकडे पाहण्याचा ॲटिट्यूड काय आहे ? मी माणूस म्हणून कसा वागतो ? नैतिकता या शब्दाशी आपण बांधिल आहोत का ? असे कितीतरी प्रश्न आहेत. ज्याने त्याने आपले जगणे तपासावे. त्याचे धागेदोरे त्याच्या अभिव्यक्तीत सापडतात. मात्र त्याचबरोबर मी असे काही 'ग्रेट' लोक पाहिले आहेत की माणूस म्हणून प्रचंड नालायक असणारे लिहितांना मात्र प्रचंड सामाजिक आणि थोर झाल्याचे दिसून येतात. दुर्दैवाने अशा कवि लेखकांची मराठीत बरीच मोठी यादी आहे. तर काही आपले जगणे आणि वास्तव यात फारकत घेऊन लिहिणाऱ्यांची संख्या मोठी आहे.

उदाहरणच द्यायचे झाले तर पुरुषोत्तम पाटील नावाचे कवी मराठीत आहे. ते बरेच ग्रेट संपादक म्हणूनही नावाजलेले आहेत. मात्र त्यांचे एकूण जगणे आणि लिहिणे याच्यात कमालीची तफावत आहे. वार्धक्यामुळे शरीर गलितगात्र झाल्यावरही तिच्या बांगड्यांची किणकिण आणि शृंगारिक प्रेम कवितेचा अलाप घेणे माझ्या कल्पनेच्या पलीकडले आहे. इथे व्यक्तिश: त्यांची नालस्ती करण्याचा आमचा हेतू नाही. मात्र अशा पद्धतीचे कवी आणि त्यांच्या कविता आणि त्यावर मराठीतील थोरांचे ऊर भरून येऊन लिहिणे न समजणारे आहे.

माझ्याबाबतीत मी जसा जगतो तसेच बोलतो तसेच लिहितो हे ठामपणे सांगू शकतो.साहित्याच्या निकषावर ते वाईटही असू शकेल. त्याचा जो काय बरा वाईट परिणाम माझ्या लिखाणावर झाला असेल. तो त्यातून दिसून येतो हे मी सांगू शकतो.

८. आपल्या भोवतालच्या वातावरणाचा निश्चितच परिणाम होत

असतो. त्यामुळे माझ्यातही निश्चित बदल झाले आहेत. अभिव्यक्तीचे स्वरूप अधिक स्पष्ट होत गेले आहे. अर्थात यात तसे बरेच फॅक्टर आहेत. म्हणजे वयाच्या २० वर्षी माझा असलेला ॲटिट्यूड आता ३८ व्या वर्षातही तसाच राहिला असे नाही. जिथे जिथे नवीन स्विकाराचे वाटले ते स्विकारणे मला वैयक्तिक आणि कवितीक आयुष्यातही महत्वाचे वाटत आले आहे. या सगळ्यात परिणाम करणारा फॅक्टर हा वय असावा असे मला वाटते. त्यानंतर मी ज्या क्षेत्रात काम करतो त्या क्षेत्रातील व्यक्तिंचा, वस्तूंचा, भाषेचा, घटनांचा अंमल माझ्यावर सातत्याने होत आला आहे. आणि कदाचित त्यातूनच आपण अधिकाधिक 'कडवे' होत असल्याचे लक्षात आले आहे. उदा.मी छपाईच्या व्यवसायात आहे. आयुष्यातली बरीच वर्षे पत्रकारितेत घालविली आहेत. याचा परिणाम माझ्यावर व माझ्या कवितेवर निश्चितच झाला आहे. तिथल्या वस्तू, माणसं, घटना, भाषा वेगवेगळ्या रुपाने कवितेत येतं राहतात. यामुळे स्वत:ची एक भाषा आपोआपच तयार होत जाते. स्वत:ची एक व्यक्त होण्याची पद्धत समृद्ध होत जाते. मात्र हे सगळे बदल कवितेच्या व्यक्त होण्याच्या मार्गातले आहेत. अभिव्यक्ती तीच आहे. यात वैयक्तिक जडण-घडण फार महत्वाची आहे. उदाहरण द्यायचे झाले तर मी २०-२१ व्या वर्षी प्रचंड नास्तिक होतो. पण आता वाटतं आपण बरेच आस्तिक झालो आहोत. हे कशामुळे होते आहे ते निश्चित सांगता येणार नाही. पण या बदलांचा परिणाम माझ्या कवितेवर झाला आहे. आणि हे परिणाम होणे म्हणजे कविता बदलणे असेल तर ती बदलली आहे. यात स्थिर राहण्याचा जो काही भाग आहे. तो आपल्या ॲटिट्यूडचाच. तो आधिक अधिक घट्ट होत राहतो वाढत्या वयाबरोबर. फॅशनेबल असे काहीच उरत नाही. माझ्या जगण्यात जो गांवढळपणा आहे तो कवितेतही उमटतो. मी तटस्थपणे जेव्हा पाहतो तव्हा ते ऑड वाटतं. पण हे बदलता येणार नाही, कारण त्यासाठी स्वत:लाच बदलावं लागेल. म्हणजेच दुसऱ्यांना बरं वाटावं म्हणून स्वत:त व लिहिण्यात काही दुरुस्त्या करुन स्वत:ला सोफेस्टिकेटेड करणं मला शक्य झालेलं नाही. अर्थात हे ही आडमुठेपणाचंच आहे, पण त्याला नाईलाज आहे.

९. कवितेची भाषा निश्चितच कवीची स्वत:ची असायला हवी. तरच तो स्वत:ची कविता लिहू शकतो. अन् खरं म्हणजे हेच तर अवघड प्रकरण आहे. मराठी कवितेत फार थोड्या कवींना हे शक्य झालं आहे.

मला स्वत:ची भाषा सापडली असे आताच विधान करणे धाडसाचे ठरेल. तसे ते कुणी करूही नये. भाषेला खेळवणं, वाकवणं भाषेची मूस शोधून काढणं फार मोठी गोष्ट आहे. मला वाटत मी बऱ्यापैसा स्वत:च्या भाषेजवळ जाण्याचा प्रयत्न करतो आहे. आणि जी काही माझी कवितेत व्यक्त होण्याची भाषा आहे ती एका दिवसात किंवा एका कालखंडात तयार झालेली नाही. यात माझ्या भोवतालचा परिसर आहे, भोवतालची माणसं आहे, मी जे वाचतो, पाहतो, ऐकतो याच्या परिणामांमधून स्वत:च्या भाषेकडे जाण्याचा रस्ता जात असावा. उदा.माझी मुलं इंग्रजी माध्यमात शिकतात. ती मराठी, हिंदी, इंग्रजी यांची सरमिसळ असलेली अशी वेगळीच भाषा बोलतात. सुरुवातीला ते बरचसं पचायला जड जात होतं. मात्र नंतर लक्षात आलं की, ज्या कालखंडात त्यांची भाषिक जाण परिपक्व व्हायची असते त्या कालखंडात त्यांच्या मनावर परिणाम करणाऱ्या भाषाच पुढे ते बोलतात. नकळतच या प्रकारचे कोलाज असलेली भाषा माझ्यावरही परिणाम करत गेली असावी. हे अगदी सुक्ष्म पद्धतीने घडत असावे असे कितीतरी घटक तुमच्या भाषेवर अतिक्रमण करत असतात. माझं हिंदीच वाचन मराठीपेक्षा अधिक आहे. कदाचित त्याचाही परिणाम झाला असेल. मी अत्यंत लहानशा खेड्यातून शहरात आलोय. तिथली भाषा, भाषिक लकबी, नंतरची शहरात आल्यानंतरची भाषा, माझ्या परिसरातली भाषा, वेगवेगळ्या प्रदेशातील वास्तवास असलेल्या मित्रांची भाषा या सगळ्यांमुळे भाषेवर बरेचशे संस्कार झाले असले पाहिजे. आणि या सगळ्यांचा परिणाम मला स्वत:च्या कवितेची भाषा मांडण्यासाठी होत असेल. अर्थात ते बरचसं कठीण आहे. ते प्रयत्नपूर्वक मिळविता येऊ शकतं. ती सापडण्याचीच गोष्ट आहे. राहिला प्रश्न रियाजाचा तर तो सगळ्यात महत्वाचा आहे. जसा गायकासाठी गाण्याचा रियाज महत्वाचा तसा तो लिहिणाऱ्यासाठी आहे. त्यासाठी डोळे उघडे ठेवण्याची गरज आहे. मराठीत कोलटकर, ढसाळ, ओक, चित्रे यांची भाषेवरची असलेली पकड हिंदीतही अपवादानेच आढळते. रियाज करायचाच असेल तर त्यासाठी माणसाने नागडे असले पाहिजे. काहीही झाकून ठेवू नये, काहीही बंद ठेवू नये. गाणं असेल, सिनेमा असेल, चित्रं असतील, पुस्तक असतील मग ती कुठल्याही विषयावरची असोत. दर्जेदार असोत की व्यावसायिक. जिथे जिथे वाचता येण्याजोग आहे ते वाचतं रहावं, घेत रहावं, सकून मिलता है.

१०. राहून गेले असेच वाटते. अगोदरच्यांनी खूप चांगलं लिहून ठेवलं आहे. आपण हे ओलांडू शकलो पाहिजे. स्वत:चा असा चेहरा कवितेला देऊ शकलो पाहिजे. ते इतकं सोपं नाही याचीही जाणीव आहेच. पण मला वाटतं ही अपूर्णत: एखाद्या कवी, लेखकासाठी कायमची असली पाहिजे. राहून गेल्यातच काहीतरी करायची 'वळवळ' जिवंत ठेवते माणसाला. माझ्यापुरतं म्हणायचं झालं तर मला अजून जिवंत राहायचं. सापडलं मात्र खूप आहे.

दुधनाथ सिंह यांच्याच भाषेत सांगायचे झाले तर - लिखने से सुख मिला। लिखने से जीना सम्भव हुआ। लिखने से जीने का हठ पैदा हुआ। लिखने से हमने दुनिया को पहचाना। लिखने से हम सयाने हुए। लिखने से हमारी विचित्र नमकहराम उदासी बार-बार लौट कर आयी। लिखने से हमने पहचाना कि हम एक 'ऐब्नार्मल' आदमी हैं। लिखने से हमने जाना कि कमीनापन, क्रूरता, उजड्डता बुरी बातें हैं। लिखने से हमने प्यार करना सीखा। लिखने से हमने भूलना सीखा। लिखकर हम मुक्त हुए और खुलकर रोये।

•••




## श्रीधर तिळवे ह्यांची कविता : एक आकलन

नितीन रिन्धे

## नितीन रिंन्दे

*नितीन रिंन्दे यांचा जन्म १९७० साली झाला.*
*मुंबई विद्यापीठातून मराठी या विषयात पदव्युत्तर शिक्षण घेतले असून सध्या ते बांद्रा येथील चेतना महाविद्यालयात मराठीचे अध्यापन करीत आहे. त्यांचा 'पंचवीस कविता' हा कवितासंग्रह लोकवाङ्मय गृहाकडून प्रकाशित झाला असून नव्या पिढीतील समिक्षक म्हणून त्यांची ओळख आहे.*

एकोणिसशे नव्वदनंतरच्या नव्या वास्तवात, स्वत:चा नवा चेहरा असलेल्या कवितेचा शोध घेताना श्रीधर तिळवेची कविता भेटते. श्रीधरने सुमारे अकरा वर्षापूर्वी मराठी साहित्यात चौथ्या नवतेच्या आगमनाची घोषणा केली. समीक्षा आणि कविता हे एकाच सर्जनशील प्रक्रियेचे दोन अविष्कार आहेत, असं मानणाऱ्या श्रीधरच्या कवितेतही ही चौथी नवता प्रकट होणे साहजिकच आहे. श्रीधरच्या यापूर्वीच्या एका भारतीय विद्यार्थ्यांचे उद्‌गार या संग्रहातील कविता साठोत्तरी मराठी कवितेच्या प्रवाहातलाच एक टप्पा होती. त्यात दलित, ग्रामीण, आधुनिकवादी अशा संवेदनांची सरमिसळ होती. या संग्रहानंतरची त्याची कविता बदलते आहे हे त्याच्या फुटकळपणे प्रकाशित होणाऱ्या कवितांवरुन जाणवत होतं.

आज श्रीधरची समग्र कविता हस्तलिखित स्वरुपात का होईना, सलगपणे वाचायला मिळाली आणि नव्वदनंतरचा आवाज या कवितेत आहे, हे जाणवलं. पण या आवाजाचं स्वरुप काय ? त्याच्या मागे असणारं मूल्यभान कोणतं ? या आवाजाची पाळमुळं कुठे दडलेली आहेत ? याचा थोडा धांडोळा घेतला. एक समकालीन कवी म्हणून श्रीधरच्या कवितेशी संवाद साधण्याचा प्रयत्न केला.

श्रीधरची कविता वाचताना जाणवणारी महत्वाची गोष्ट म्हणजे तिचा पैस विशाल आहे.तो स्थिर, अचल असा नसून becoming घडणारा,बदलत राहणारा असा आहे. ग्रामीण ते शहरी ते महानगरी; गुण्डगिरी ते राजकारण ते अध्यात्म; सामाजिक चळवळी ते बॉलिवूड-अशी स्थित्यंतरं एकमेकांना छेदत राहतात. या स्थित्यंतरांवरच अवधान केंद्रित करुन त्यांना भाषेत पकडण्याचा प्रयत्न कवी म्हणून श्रीधरने केला आहे. आधुनिक मराठीत महानगरी कविता, ग्रामीण कविता अशा तयार अवस्थांना आपण वाचक म्हणून सरावलेलो आहोत. श्रीधरची कविता इथं किंचित वेगळी ठरते.

दुसरी बाब म्हणजे, श्रीधरच्या कवितेतली विविध द्वैत आणि त्यांचं स्वरुप पाहण्यासारख आहे. संशय आणि श्रद्धा, व्यक्ती आणि समाज, प्रेम आणि अध्यात्म, संभोग आणि समाधी अशा द्वैतांचा शोध घेण्याचा प्रयत्न या कवितेने केला आहे. या द्वैतांमधील युग्मांचे परस्परसंबंध विरोधाचे / संघर्षाचे असतात, अशी परंपरा आहे. उदाहरणार्थ, संशय हा विज्ञानाकडे घेऊन जाणारा, तर श्रद्धा ही अंधश्रद्धेकडे वाटचाल करणारी; व्यक्ती विरुद्ध समाज यांच्यातील द्वंद्वावर तर संपूर्ण आधुनिक साहित्याची इमारत उभारली गेलेली; स्री-पुरुष प्रेमाची परिणती नातेसंबंध, तृष्णा, वेदना, भौतिक सुख यांच्यात होणारी, तर अध्यात्म हे सर्व बंध तोडून आत्मनिष्ठपणे स्व चा शोध घेणारं श्रीधरच्या कवितांमधून मात्र या द्वैतांच्या परस्परविरोधी गुणधर्मांबरोबरच त्यांच्यातील अद्वैताचाही वेध घेतलेला दिसतो. एकूणात मानवी जीवनाकडे समग्रपणे पाहण्याचं भान या कवितामधून दिसतं.

श्रीधरने देशीवाद नाकारला आहे. एका कवितेत त्याने देशीवाद्यांना आंधळं ठरवलं आहे. पण वर उल्लेखलेली दोन वैशिष्ट्यं त्याच्या कवितेला भारतीय दर्शनाच्या संचितातून लाभलेली आहेत. आधुनिक किंवा आधुनिकवादी कवितेपेक्षा श्रीधरची कविता वेगळी ठरण्यात या दोन वैशिष्ट्यांचा हातभार लागला आहे.

•••

रोमँटिक आणि आधुनिकवादी अशा दोन्ही नवतांना श्रीधरच्या कवितेने नाकारलं आहे. पावसाळा : १९९० या कवितेत त्याने नव्या ग्राहकवादी / बाजारवादी दृष्टिकोनातून पावसाळ्याचा आणि शेतीचा काय अर्थ होतो हे सांगितलं आणि रोमँटिसिझमला श्रद्धांजली वाहिली. आधुनिक काळात रोमँटिक दृष्टि बाळगून जगणाऱ्यांची होणारी गोची आमदारपुत्र आणि डार्लिंग या विरचित कवितेतून मांडली.

एक संवेदनशील कवी ते बॉलीवुडच्या ग्लॅमरस दुनियेतला एक्झिबिशनिस्ट; गावातली गुण्डगिरी ते शहरातलं राजकारण / समाजकारण आणि समाधी अवस्था प्राप्त करण्यासाठी धडपडणारा साधक हे जीवनातले चित्रविचित्र प्रवास अत्यंत संवेदनशीलतेने या कवितेत टिपले आहेत. मी पेप्सी कोक पीत नाही / मी माझ्या तहानेल्या पाण्यामध्ये कमळू देतो असं म्हणणारा हा कवी तृष्णांना धिटाईने सामोरा जातो. या कवितांमधून गोचर होणारा कवी, महानगरात आयुष्य काढायला म्हणून येतो, पण लौकिकार्थाने अपयशी ठरतो, त्यामुळे कधी तो टोकाच्या निराशेच्या गर्तेत कोसळतो तर कधी या महानगरी संस्कृतीशी दोन हात करण्याची

तर कधी तिच्यातच सामावून जाण्याची धडपड करतो. व्हर्च्युअल रिअॅलिटीचे ब्लाईंड सिडक्शन भारून टाकतोय आयुष्याचा अवघा नाका या वस्तुस्थितीची जाणीव झाल्यावर आयुष्य म्हणजे रिमोटमधील कंट्रोलचा आभास असा आपल्या आयुष्याचा मथितार्थ त्याला उमजतो

मुंबईसारख्या महानगरात स्वातंत्र्योत्तर काळात महानगरी संस्कृती जन्माला आली. अलिकडे ती पुणे-नाशिकसारख्या इतर मोठ्या शहरांमध्ये पाझरु लागली आहे. साठोत्तरी कवितेने या महानगरी जीवनशैलीची दखल सर्वप्रथम घेतली (त्यापूर्वी मर्ढेकरांच्या कवितेत महानगरांच्या आगमनाची चाहूल लागली होती.) महानगराला साठोत्तरी कवितेने सरसकट नकार दिला. अमानुष, यांत्रिक महानगरी वास्तव या कवितेला भावलं नाही. महानगरी दलित कवितेने देखील हाच प्रकार आळवला आहे.

दरम्यान महानगर जीवन देखील गेल्या दहा पंधरा वर्षांत विलक्षण बदलले आहे. भांडवलशाही, औद्योगिकरणाची जागा आता नवभांडवलशाही कार्पोरेट कल्चर माहिती तंत्रज्ञानाने घेतली आहे. सरकारच्या आर्थिक उदारीकरणाच्या धोरणांमुळे (१९९० पासून) समाजात मोठी उलथापालथ होते आहे. बाजारवाद, चंगळवाद, उपभोगवाद, स्पर्धात्मक जीवन इत्यादी नव्या कल्पना, संज्ञा महानगरी संस्कृतीचं, जीवनाचं मापन करण्यासाठी उपयोगात येत आहेत. पारंपरिक मूल्यं बदलत आहेत; एकूण जीवनात उथळपणा येऊन करमणूक प्रधान माध्यमांनी जनमानसावर ताबा मिळविला आहे. नेमक्या या काळात श्रीधर महानगरात जगतोय. करमणूक प्रधान माध्यमांवरच त्याची रोजी-रोटी अवलंबून आहे. अशा परिस्थितीत त्याची कविता या नव्या महानगरी वास्तवाला कशी सामोरी जाते ?

मी जीवन अटेन्ड करत नाही / संपूर्ण जीवनात अटेन्टिवली असतो अशा अस्सल भारतीय दृष्टिकोनातून तो महानगरातील वास्तवाला सामोरा गेला आहे. टी.व्ही., इंटरनेट, जाहिराती, सिनेमा यांतून जे एक आभासमय वास्तव महानगरी मानवाभोवती उभारलं गेलेलं आहे, त्याला श्रीधर चिन्हसृष्टी म्हणतो माणूस चिन्हात जन्मतो / चिन्हात वाढतो / चिन्हात मरतो असं बौद्धिक सूत्र त्याने एका कवितेत मांडलं आहे. झाड या कवितेतून चिन्हसृष्टीत वावरणाऱ्या माणसांची अनुभवदृष्टी कशी करप्ट झाली आहे, ते त्याने दाखवून दिलं आहे. ही कविता स्व चा आणि भोवतालाचा शोध घेते, शहरालाच भाषेत बध्द करण्याचा प्रयत्न करते आणि प्रेमानुभवाला सामोरी जाते, व चिन्हसृष्टीत रममाण झालेलं जीवन भावात्मक पातळीवर व्यक्त करते.

खिडकीतून प्लायओव्हर इंडिया डॉटकॉमचे होर्डींग रुळांवर हगतंय इंडियन कल्चर अशा एकाच ओळीत महानगरी संस्कृतीतील सर्व रंगांचे फ्यूजन साधण्याचा श्रीधरचा प्रयत्न दिसतो. बांधकाम चालू आहे (उत्तरार्ध) या कवितेत मयसभेचं संकिर्तन टीपेला पोहोचलं आहे. काम संपताच फेकून दिलेल्या डिस्पोजेबल रिवोल्यूशन्स अशी आजवरच्या क्रांत्यांची उपयुक्तवादी मीमांसा, प्रत्येक मूल असते वाट चुकलेला कंडोम अशा शब्दात मानवाच्या अस्तित्वाची नवी कारणमीमांसा, अध्यात्म प्रेम या क्षेत्रामधला बाजार, खोटेपणा, कन्झुमरिझम-वस्तुवाद या साऱ्याचं जीवनातलं अग्रस्थान या कवितेतून प्रकट झालं आहे.

याच प्रेरणेतून साईबाबा डॉटकॉम ही दीर्घकविता जन्मली आहे. मराठी समाजाची दिंडी आता वाट बदलून विठ्ठलाकडून साईबाबाकडे वळली आहे. पण या दिंडीने आता भक्तीचा अर्थही बदलून टाकला आहे. बॉलिवूड आणि अंडरवर्ल्डमधल्या लोकांपासून सर्वसामान्यांपर्यंत साऱ्यांनी मांडलेला साईबाबांच्या भक्तीचा बाजार श्रीधरने या कवितेतून अत्यंत भेदकपणे उघडा पाडला आहे.

जागतिकीकरण-बाजारीकरणामुळे जन्माला आलेल्या नव्या वास्तवाची अत्यंत संवेदनशीलतेने श्रीधरच्या कवितेने दखल घेतली आहे. यालाच चिन्हसृष्टीवाद किंवा चौथी नवता असं म्हणायचं का ? तसं असेल, तर चौथी नवता श्रीधरच्या कवितेत अवतरली आहे, हे उघड आहे. पण महत्वाची गोष्ट म्हणजे श्रीधरची कविता इथेच थांबत नाही. चिन्हसृष्टीच्या चिन्हांकनाहूनही अधिक काहीतरी या कवितेत आहे.

समकालीन समाज-संस्कृतीबद्दलचं समग्र भान प्रकट करण्याचा प्रयत्न ही कविता करते आहे. हा काळ स्थित्यंतरांचा काळ आहे. पारंपारिक जीवनमूल्य, समजुती, गृहितक यांना मोठे हादरे बसत आहेत. बदलाचा वेग विलक्षण आहे. या सर्वांमुळे कधी हबकून गेलेलं, गोंधळून गेलेलं, कधी त्यावर मात करण्याचा प्रयत्न करणारं, तर कधी जुळवून घेण्याच्या तयारीत असणारं कवि-व्यक्तित्व या कवितेतून व्यक्त झालेलं आहे. पण एकूणच कविता वाचताना जाणवत राहतं की हे कवि-व्यक्तित्व ह्या जगात ह्या वास्तवात पाहुणा ठरतं आहे. स्वत: कवीचं व्यक्तित्व महानगरी झंझावातातून बदलत चाललं असलं, तरी अध्यात्माचा मूळचाच झरा मात्र अजूनही नष्ट झालेला नाही. घर, गाव, आई-वडील इथून झालेले संस्कार अध्यात्मिक दर्शनांमधून प्राप्त झालेली दृष्टी यामूळे कवी शेवटपर्यंत पाहूणाच राहिला आहे की काय अशी शंका येते.

आधी म्हटल्याप्रमाणे ग्रामीण शहरी महानगरी अशा विविध पातळ्यांवर रहिवास करतांना या पातळ्यांवरील नवी स्थित्यंतरं, नवी द्वंद्वं, नवे संघर्ष समजावून घेण्याचा प्रयत्न या कवितेने केलेला दिसतो. व्यक्तिगत किंवा सामाजिक अशा रुढ कप्प्यांवर मात करुन कवी या अनुभवांना भिडलेला आहे. उदाहरणार्थ, प्रेमानुभव अथवा प्रेमभंगानुभव हा तसा खाजगी आणि वैयक्तिक. पण श्रीधरच्या कवितेत तो संस्कृती-संघर्षाचं रुप धारण करतो. किंवा बाजारु जगातून आईकडे / गावाकडे / गर्भाशयात परतण्याची प्रेरणा, हा त्याने महानगरी संस्कृतीला दिलेला नकार असतो. एका ठिकाणी प्रेयसी आणि शहरी संस्कृती यांच्यातलं उचलीत झगा दाखवीत मांड्या शहरोशहरी शहरे शहरे असं साम्य कवीला जाणवलं आहे. कवीची प्रेयसी महानगरी संस्कृतीतून आलेली व्यक्तिवादी विचारसरणीची तर कवी ग्रामीण समूहजीवनातून आलेला. त्यामुळे-

*कुटुंब पूर्ण विखरवणारी तुझी कॉस्मॉपॉलिटीन इडिपसी*
*आणि कुटुंबाची काडी काडी गोळा करणारी*
*माझी ग्रामीण सिसिफसी*

हा भेद कवीला जाणवतो. तरीही -

*बघ माझे हिरवे गवत विसर तुझे प्रदुषित शहर*
*इथे सांडतात अष्टौप्रहर मातीचेच हिरवे बहर*
*तुझी सिमेंटची धूळ जरा फुंकर मारुन उडवून लाव*
*तुझ्या अस्तित्वाच्या वृक्षावर कलम कर माझे गाव*

असा प्रेयसीला बदलण्याचा प्रयत्न कवीने केलेला दिसतो. प्रेमातला शेवटचा अनुभव मात्र अत्यंत विदारक ठरतो. कवीला त्याची तुलना अस्पृश्यतेच्याच अनुभवाशी करता येते.

अस्पृश्यच राहिलो तिच्या कॉस्मॉपॉलिटीन गावगाड्यात पाणी दिले तेही उपकारासारखे

ती ग्लोबल चालावी म्हणून शिवत राहिलो देहाची चोख टिकाऊ पादत्राणे

हे केवळ प्रेमभंगाचं दु:ख नाही. जागतिकीकरण-बाजारीकरणाच्या रेट्यातून जन्माला येऊ घातलेल्या नव्या वर्ण जाती-व्यवस्थेचं सूतोवाच कवीने केलं आहे.

आभासमय मृष्टीचा आणि नाजारु नात्यांचा उबग येऊन असेल कदाचित, कवीला निर्वाणाची, शून्यत्वाची, गर्भाशयाची ओढ लागलेली दिसते. श्रीधरची बुद्धाच्या शून्यवादाकडे किंवा वैदिकांच्या अद्वैताकडे वळण्याची प्रेरणा बहुधा हीच असावी.

आई हा श्रीधरचा आणखी एक आसरा आहे.

*ही अॅंड शूट करुन*
*म्यान करेन मी माझी कमर्शियल गन*
*आणि आईचा स्तन हुंगण्यासाठी*
*पुन्हा एकदा नॅचरल हिरवागार होईन*

इथे श्रीधरच्या प्रेरणा अध्यात्मिक मूल्यव्यवस्थेत स्वत:चं स्थैर्य शोधतांना दिसतात. बांधकाम चालू आहे या कवितेतून चिन्हसृष्टीचा ननैतिकपणे स्वीकार करणारा, परिवर्तनवादी आणि रिपब्लिकन्स या कवितांतून पुरोगामी चळवळीचं फोलपण दाखवून देणारा श्रीधर तुमचे स्क्रीन सारख्या कवितेत बिनडोक चंगळवादाविरुद्ध लढण्यासाठी हातात दगडच घेतो.

•••

१९९० नंतर आभासमय वास्तवात रमलेल्या समाजाची जागरुक नोंद श्रीधरने आपल्या कवितेत घेतली आहे. पण या कवितेत लपलेला अध्यात्मिक संवेदनशीलतेचा मूळचा झरा या वास्तवातही त्याला भारतीय दर्शन परंपरेकडे घेऊन जातो. म्हणूनच माझ्या समकालीन कवींमध्ये श्रीधरची कविता मला महत्वाची वाटते.

•••

(पॉप्युलर प्रकाशन, मुंबईतर्फे श्रीधर तिळवे यांचा क.व्हि. हा कविता संग्रह लवकरच प्रकाशित होत आहे.)

**सौष्ठवला ज्यांना कविता पाठवायच्या आहेत त्यांनी कृपया कवितेसोबत दहा प्रश्नांची उत्तरे पाठवावी.**
**त्याशिवाय कविता छापल्या जाणार नाहीत.**
**शक्यतोवर किमान पंचवीस कविता पाठवाव्यात म्हणजे दहा कवितांचा गुच्छ छापणे सोपे जाईल.**
**सोबत कवीने आपला संपूर्ण परिचय पाठवावा.**

***श्रीधर तिळवे***
**१६, तपोवन, ५३-सी विंग एन एन पी-२, मालाड (पूर्व) मुंबई**

*(पृष्ठ क्रमांक १३ वरून)*

टाकले जातात ? हे ह्या देशाच्या व्यवस्थेतील कळीचे प्रश्न आहेत आपली खरी शत्रु ही 'विश'ता आहे हे ब्राम्हणांनी फार पूर्वीचे ओळखले होते म्हणूनच त्यांनी क्षत्रियांशी युती करुन तिला प्रथम दडपले नंतर मग क्षत्रियांनाही शूद्र करुन टाकले विसाव्या शतकातही इथल्या ब्राम्हणांना ब्रिटीश हे आपले दुय्यम शत्रु आहेत ह्याची पूर्ण कल्पना होती त्यामुळे त्यांनी ब्रिटीशांशी लढा संपल्या संपल्या प्रथम महात्मा गांधीनाच गोळ्या घातल्या म.गांधी हा ह्यांच्या अजेंडाचा मुख्य शत्रु आहे ह्याची ह्यांना पूर्ण कल्पना होती दुर्दैवाने कॉंग्रेसला आणि इतरांना हे कळाले नाही आणि मग भाजप सत्तेवर आला.

विशतेतील सर्वच लोक देशी भाषेत बोलत राहिले मग ते महावीर बुद्ध असो की म.गांधी रजनीश (रजनीश नंतर इंग्रजीकडे वळले पण रजनीशांनी सगळे देशी अध्यात्म मार्गीत आणून सोडण्याचा उपक्रम मोठ्या प्रमाणावर केला) कारण ह्या सर्वांना बहुजन समाजात रस होता. त्यांच्यात परस्परविरोधही होते म्हणजे आंबेडकर लोकशाही समाजवादी तर गांधी व रजनीश भांडवलशाही -वादी (गांधी आणि रजनीश दोघेही आम्हाला अंतिमत: समाज वादच आणायचा आहे असे म्हणत) आजच्या प्रसारणाच्या युगात ह्या सगळ्यांचा एकत्र विचार केला तरच काही मार्ग सापडेल.

वैश्यांची सर्वाधिक उपेक्षा जर कुठे झाली असेल तर ती महाराष्ट्रात विशेषत: पेशवाईत शिवशाहीत मात्र ही उपेक्षा नव्हती 'आज्ञापत्रा'त साहूकारांना व्यापार करणाऱ्यांना वखार टाकण्यासाठी मदत करण्याच्या खास आज्ञा दिल्या गेल्यात. शिवाजी महाराजांना स्वराज्य स्थापनेसाठी मदत करणाऱ्या अनेक वैश्य कुटुंबांच्या वंशजाशी माझा व्यक्तिगत परिचय आहे. ही कुटुंबे आजही हा इतिहास अभिमानाने सांगतात. जगात कुठेही राज्य निर्माण झाले की तिथे राजधानीत वैश्य जमतात. जगात पेशवाई ही कदाचित एकमेव राजवट असेल जिने पुणे ह्या आपल्या राजधानीत वैश्यांच्या ऐवजी ब्राम्हण जास्त जमवले. परिणामी व्यापार कमी आणि अनुष्ठाने जास्त. ह्याच अनुष्ठानवाद्यांनी नंतर पुण्यात रजनीशांना ठार मारण्याचा प्रयत्न केला. तुकारामाच्या वह्या बुडविल्यावर वारकरी धाड, गांधींना गोळ्या घाल, रजनीशांच्यावर सुरीहल्ला कर हे उद्योग इथल्या ब्राम्हणांनी फार पूर्वीपासून केलेत. विशतेला बदनाम करण्याची एकही संधी इथले ब्राम्हण्य सोडत नाही. त्यामुळे गांधी, रजनीशांविरुद्ध जेवढे गरळ [illegible] ओकता येईल तेवढे ओकायचे हा प्रकार इथे सर्रास चालतो. [illegible] च्या चुकीची भाषांतरे हा ब्राम्हण्याचा धर्म झाला आहे. बरे ही सगळी भाषांतरे मौखिक कारण वैश्य, शूद्र, अतिशूद्र आणि आदिवासी हे सगळेच आता आता शिकायला लागलेत. त्यामुळे मौखिक प्रचाराला बळी पडणे सहज गोष्ट होऊन जाते आता मात्र वाढलेली साक्षरता मूळ संहितेपर्यंत घेऊन जाईल किंवा अस्सल भाषांतरे उपलब्ध होतील अशी अपेक्षा आपण करु शकतो.

•••

कला ही मुख्यत: अनुभव देते हा अनुभव वैश्विक असतो की देशी असतो वगैरे वाद निर्माण होतात पण खरे तर कला ही मूलत: विशिष्ट मितीकांचा अनुभव देत असते म्हणजे ह्या मितीकात विशिष्ट व्यक्ति, विशिष्ट वनस्पती, विशिष्ट वस्तू वा चिन्हे ह्यांचा समावेश होऊ शकतो. कलाकृतीत ह्या मितीकांचे त्यांच्या एकमेकां-विषयीच्या संवेदनांचे ह्यांच्यातील क्रिया प्रतिक्रियाचे चिन्हीय जाळे विणलेले असते. हे जाळे आणि रसिकांची आत्मसृष्टी ह्यांच्या परस्परसंबंधातून अनुभव निर्माण होत असतो.

प्रश्न असा असतो की मी भाषांतर का वाचतो किंवा मी माझ्या भाषेतील सोडून इतर भाषेतील का वाचतो ? ह्या प्रश्नांची उत्तरे शोधतांना मला चार पद्धतीचे वाचन स्पष्टच दिसते.

**१.स्वभाषी वाचन :** स्वभाषेतील कलाकृतीचे वाचन उदा.माझे मराठीतील वाचन

**२.परभाषी वाचन :** स्वभाषा नसेलल्या पण मला अवगत असलेल्या भाषेतील वाचन उदा.माझे हिंदी व इंग्रजीतील वाचन

**३.भाषांतरीत वाचन :** स्वभाषेत इतर भाषेतील कलाकृतीत झालेल्या भाषांतराचे वाचन उदा.मराठीत भाषांतर झालेल्या फ्रेंच कृतीचे वाचन

**४.परभाषांतरीत वाचन :** मला अवगत असलेल्या भाषेत मला अवगत नसलेल्या भाषेतील भाषांतरीतकलाकृतीचे वाचन उदा. माझे इंग्रजीतील व हिंदीतील फ्रेंच जर्मन वगैरे भाषांतून भाषांतरीत झालेल्या कृतीचे वाचन.

पहिल्या प्रक्रियेत भाषा आणि मी ह्यांच्यात अद्वैत असते त्यामुळे त्याला अद्वैती वाचन म्हणून (आई व तिच्या पोटातील बाळ) दुसऱ्या प्रक्रियेत ती भाषा मी एखाद्या पुरुषाचे बीज देहात घ्यावे तशी पोटात घेतलेली असते त्यामुळे त्याला युग्मीय वाचन म्हणू. तिसऱ्या पद्धतीत ती भाषा आईपासून वेगळी असते तिच्यापासून नाळ तुटलेली असते. हिला विशिष्टाद्वैती वाचन म्हणू ह्या कलाकृती स्वभाषेत असल्याने त्यांचे अर्धे जीन्स माझ्यासारखे असतात पण तरीही ह्या माझ्या देहापासून वेगळ्या असतात चौथ्या अवस्थेत मात्र त्या सावत्र मुलासारख्या असतात त्याला आपण अनुकाद्वैती वाचन म्हणू. काहीवेळी आपण स्वभाषेत आपल्याला अवगत असलेल्या भाषेतील कलाकृतीचेही वाचन करतो त्याला

काय म्हणायचे हा प्रश्न आहे. पण ती कलाकृती आपल्याला अपरिचीत असेल तर ते वाचन भाषांतरीत वाचनच असते. पण परिचित असेल तर मात्र द्विहाती ( Second Hand Reading) भाषांतरीत वाचन होते.

आपणाला जगाचा जो अनुभव असतो तो पुढीलप्रमाणे

**१.प्रत्यक्ष अनुभव :** आयुष्याचा प्रत्यक्ष इंद्रियाना आलेला अनुभव.

**२.अनुमानात्मक अनुभव :** ज्याला प्रत्यक्ष अनुभव आलाय त्याच्यामार्फत आलेला अनुभव.

**३.चिन्हात्मक अनुभव :** चिन्हामुळे आलेला अनुभव (प्रत्यक्ष ज्ञातानुभवी अनुपस्थित असतो.)

चिन्हात्मक अनुभव हा चिन्हकृतीतून येतो भाषांतर वाचन हे आपणाला चिन्हात्मक अनुभव देते आणि अनेकदा हा चिन्हात्मक अनुभव प्रत्यक्ष मिळणे शक्य नसल्याने आपण भाषांतराकडे वळतो म्हणजे भाषांतर वाचनामागे जिज्ञासा ही असोशी (भूक, तृष्णा) असते असं म्हणता येईल.

कलेचा व्यवहार हा विशिष्टतेचा असतो आणि ही विशिष्टता अनुभवण्यासाठी मी भाषांतराकडे वळतो. कलेतील सृजनाचे मूल्य दोन पद्धतीचे असते.

**१.शोधात्मक सृजनमूल्य :** ह्या प्रत्यक्ष अनुभवांचे चिन्हीय अनुभवात रुपांतर केलेले असते हे प्रत्यक्ष अनुभव फक्त त्या त्या कलावंताला आलेले असतात किंवा इतरांकरवी सापडलेले असतात. उदा. मराठीतील वलुतं हे आत्मकथन.

**२.संशोधनात्मक सृजनमूल्य :** इथे प्रत्यक्ष अनुभव नसतो पण कल्पनेच्या साह्याने कुणालाही न आलेला अनुभव कलावंताने जन्माला घातलेला असतो तो जितका अलौकिक तितके त्याचे मूल्य अधिक. उदा.वामन परत न आला (जयंत नारळीकर)

माझ्या स्वत:च्या अनुभववाढीसाठी भाषांतरातून प्राप्त होणाऱ्या दोन्ही प्रकारच्या अनुभवांची मला निकड असते. अनेकदा एखाद्या देशातील अनुभवसृष्टी कळाली की तो देशही कळू लागतो. तो देश कळला की त्याचे काय करायचे ते अधिक चांगल्या रितीने ठरवता येते. मल्टीनॅशनल्सना भारत समजून घेणे हे त्यांच्या मार्केटींगच्या व प्रसाराच्या दृष्टीने गरजेचे असल्यानेच ह्यापुढे भारतीय साहित्याच्या भाषांतराना प्रचंड मागणी येणार हे उघड आहे. आज ह्या घडीला ह्या कंपन्यांचा टार्गेट कस्टमर हाच मुळात मार्गी संस्कृतीतला रहिवासी आहे. त्यामुळे सहाजिकच भारतीय इंग्रजी साहित्याला सर्वात जास्त भाव आहे. भारतीय मार्गी ग्राहक समजून घेण्यासाठी त्यांना हे साहित्य जास्त उपयोगी वाटते. ज्याक्षणी देशी ग्राहक हा बाजारपेठेतील महत्वाचा ग्राहक होईल त्याक्षणी हे लोक देशी साहित्याचे महत्व वाढवत नेतील आणि ते मार्गी भाषेत आयातही करतील. तुकारामासारखा कवी हा मराठी ग्राहक समजून घेण्यासाठी महत्वाचा वाटत असल्याने तुकारामाला सध्या भाषांतराच्या बाजारपेठेत बऱ्यापैकी भाव आला आहे. मार्गी कलावंतांनी भारतीय ग्राहकाचे आम्हीच खरे प्रतिनिधीत्व करतो असा आभास निर्माण करण्याचे प्रयत्न चालवले आहेत त्यात त्यांना यशही मिळताना दिसते आहे. भारतातील हिंदुस्थानी ह्या मार्गी भाषेतील अनेक चित्रपट तारे हे अनेक मल्टीनॅशनल्सचे जाहिरात मॉडेल्स वा ब्रॅण्ड ॲम्बेसेडर का बनलेत हे समजून घ्यायचे असेल तर कलेचा अर्थकारणाशी असलेल्या संबंधाची नीट चिकित्सा करावी लागेल देशीवादांच्या चिपळ्या वाजवून अशी चिकित्सा करता येणे शक्य नाही त्यासाठी मार्गी, देशी, पोटी व जमाती ह्यांना सम्यक दृष्टीने पाहण्याची गरज आहे.

•••

कुठल्याही अनुभवाला नऊ तत्वे असतात.

**१.सतात्मक तत्व :** हे प्रथमदर्शनी स्पष्ट दिसणारे असे अंग असते त्यात 'सौष्ठव' 'अंग' 'शरीर' 'देह' 'काया' 'चैतन्य' इत्यादींचा समावेश होतो.

**२.चित्तात्मक तत्व :** हे त्या अनुभवातील बौद्धिक अंग असते 'जाणीव' 'बुद्धी' 'विचार' 'विवेक' 'प्रज्ञा' 'सत्य'चा समावेश होतो.

**३.आनंदात्मक तत्व :** हे त्या अनुभवातील भाव भावनांची नोंद ठेवते रस निर्माण करते 'स्वभाव' 'भाव' 'भावना' 'रस' 'भक्ती' 'करुणाशांती' इत्यादींचा समावेश होतो.

**४.शिव तत्व :** ह्यात 'संवेदक' 'बोध' 'कर्ता' 'साधक' 'साक्षी' 'बुद्ध' इत्यादींचा समावेश होतो.

**५.शक्ति तत्व :** ह्यात 'असोशी' 'पिपासा' 'आसक्ती' 'इच्छा' 'स्फूर्ती' 'प्रतिभा' इत्यादींचा समावेश होतो.

**६.क्रिया तत्व :** ह्यात 'स्पंदन' 'स्फुरण' 'हालचाल' 'कृती' 'कर्तव्य' 'कार्यकर्म' इत्यादींचा समावेश होतो.

**७.अवकाश तत्व :** ह्यात 'पैस' 'पर्यावरण' 'भूगोल' 'क्षेत्र' 'अनंत' 'पूर्ण' इत्यादींचा समावेश होतो.

**८.काळ तत्व :** ह्यात 'वेळ' 'काळ' 'शून्य' (वेळ, मृत्यू, महामृत्यू) इत्यादी समावेश होतो.

**९.स्थिती तत्व :** ह्यात 'असंवेद्य' 'संवेद्य' 'प्रकट' 'जागृत' 'उन्नत' 'मुक्त' अशा स्थितींचा समावेश होतो. वरील आठ तत्वे ही ह्या स्थितीत असतात.

'अनुभव' हा ह्या नऊ तत्वाचं 'जाल' असतो.

सर्व अनुभवकृती ह्या अनुभवांचे जाळे असल्याने त्याही ह्या

नऊ तत्वांनी विणल्या गेलेल्या असतात (प्रत्येक मितिक ह्यान तत्वांनी विणले गेलेले जाळे असते.) आणि त्या त्या कलेचे माध्यम हे त्या जाळ्यांचा 'धागा' असते.

भाषांतरकर्ता भाषांतर करतो म्हणजे काय करतो ?

तर भाषा हे जे साहित्यकृतीचे सतात्मक तत्व आहे त्यातील भाषेचे सौष्ठव, भाषेचे अंग, भाषेचे शरीर, देह, काया विचलीत करून उरलेली आठ तत्वे इतर भाषेत रुपांतरीत करतो त्यासाठी तो दुसरी भाषा माध्यम वा धागा म्हणून वापरतो एकीकडे त्याला सतात्मक तत्व पूर्ण पालटायचे असते तर दुसरीकडे त्या कृतीतील इतर आठही तत्वे जशीच्या जशी दुसऱ्या भाषेत जातील ह्याची काळजी घ्यायची असते. तो एका अर्थाने सतात्मक तत्वाचे इतर तत्वाशी जे मूळ कृतीत अद्वैत निर्माण झालेले असते ते तो तोडत असतो आणि त्यांच्यात द्वैत निर्माण करून पुन्हा ज्या भाषेत त्याला मूळ कृतीचे भाषांतर करायचे आहे तिच्याशी त्या आठ तत्वाचे पुन्हा अद्वैत निर्माण करतो. भक्तीची परिभाषा वापरायची तर तो परमेश्वर असतो. स्वत:चा भक्ताला स्वत:पासून तोडतो ह्या आठ तत्वांचा जगात धाडतो आणि पुन्हा मोक्षाची साधना करायला लावून पुन्हा (मुळ अवयवात) नवा जन्म घ्यायला लावतो. भाषांतरकार हा भाषिक परमेश्वर असतो तो भाषाकृतीला भाषेपासून तोडतो तिला साधना करायला लावून पुन्हा दुसऱ्या भाषेतून तिला मूळ अनुभव कृतीत आणतो आता फक्त तिचे सत तिचे शरीर बदललेले असतात मात्र आठ तत्वे पुन्हा जन्मलेली असतात वाढलेली असतात मोठी झालेली असतात. हा एका अर्थाने त्या कृतीचा पुनर्जन्म असतो शरीर बदललेले असते. हे घडताना काहीवेळा काही सांडते काही नवे रुप घेते. एका अर्थाने भाषांतर प्रत्यक्ष मूळ संहितेची अनुमानात्मक संहिता असते. भाषांतरकार हा प्रत्यक्ष संहितेचा प्रथम वाचक असतो. तो साधारणपणे परभाषी वाचन करतो आणि त्या संहितेला स्वभाषेत पुर्ननिर्माण करतो क्वचितप्रसंगी स्वभाषी संहिताचे वाचन करून तिचे परभाषेत पुर्ननिर्माण [illegible] ाने. (दिलीप [illegible] ह्यांचे Says Tuka हे भाषांतर [illegible] ात भाषांतराचेही प्रकार होतात.

**स्वभाषी भाषांतर :** परभाषेतील संहिताचे स्वभाषेत भाषांतर किंवा भाषांतरकर्ता द्विभाषी वगैरे असेल तर एका स्वभाषेतील संहितेचे दुसऱ्या स्वभाषेत भाषांतर.

**परभाषी भाषांतर :** स्वभाषेतील संहितांचे परभाषेत भाषांतर.

**परपरभाषी भाषांतर :** अवगत परभाषेतील संहितेचे अवगत दुसऱ्या परभाषेत भाषां[illegible]

**परस्वभाषी भाषांतर :** अवगत नसलेल्या परभाषेचे अवगत असलेल्या परभाषेत झालेल्या भाषांतराचे स्वभाषेत केलेले भाषांतर उदा. रशीयन वॉर ॲन्ड पीसचे इंग्रजीतून मराठीत केलेले भाषांतर.

**परपरपरभाषी भाषांतर :** अवगत नसलेल्या परभाषेचे अवगत असलेल्या परभाषेत झालेल्या भाषांतराचे तिसऱ्या परभाषेत केलेले भाषांतर म्हणजे रशियन वॉर ॲण्ड पीसचे इंग्रजीतून हिन्दी भाषेत केलेले मराठी भाषी लेखकाचे भाषांतर.

१ ते ५ पर्यंत उतरत्या क्रमाने भाषांतराचा दर्जा उतरु शकतो. मराठीत जर्मन नाटकाचा इंग्रजीतील बरटोल्ट ब्रेश्तच्या कॉकेशियन चॉक सर्कल ह्या भाषांतराचा विजया मेहता ह्या मराठी दिग्दर्शिकेने केलेल्या सूचनात्मक भाषांतराचे पुन्हा भाषांतर चि.त्र्य. खानोलकरांनी अजब न्याय वुर्तळाचा म्हणून केलेले आहे त्यामुळे नेमकी काय हानी झाली हे जर्मन तज्ञच सांगू शकतो.

ज्ञानात्मक संहितांची गोष्ट मात्र वेगळी असते इथे ज्ञान हे भाषेपासून पूर्णपणे तोडून भाषांतरीत करता येते भाषेबद्दलचे आशय आणि अविष्कार ह्यांच्या बाबतीतले तथाकथीत अद्वैत सिद्धांत ज्ञानात्मक संहितात त्यांच्या भाषांतरात कोसळून पडतात इथे आशय पूर्ण वेगळा काढून दुसऱ्या भाषेत ओतता येतो भाषा ही इथे जैविक रहात नाही ती यांत्रिक वा तांत्रिक बनते भाषेबद्दलचे सिद्धांत हे [illegible]नेकदा अनुभवात्मक संहिता केन्द्री ठेवून एकांगीपणे मांडले [illegible]तात खरेतर भाषा ही पाण्यासारखी अत्यंत लवचीक गोष्ट आहे [illegible] अद्वैती असू शकते तशी द्वैती युग्मीय अशीही होऊ शकते. [illegible]षेबाबत कुठल्यातरी एका अवस्थेचा आग्रह धरणे हा सत्याचा [illegible]र्यासच असतो. भाषा ही गोठू शकते, वाफाळू शकते आणि [illegible] शकते तसेच ती एकाचवेळी बर्फ,वाफ आणि पाणी असू शकते. भाषेचं काय बनवायचं हे भाषकाच्या हाती असते. भाषा आणि भाषक हे दोघेही एकमेकाशी खेळत असतात. भाषा कधी [illegible] होते भाषकाशी रत होते कधी भाषक स्त्री होतो भाषेशी रत [illegible] कधीही कुणीही एकमेकापासून गर्भार राहतात कधी मूलांना [illegible]देतात त्यातून भाषिक कृती जन्मत असतात भाषा ही भाषकाने [illegible]ाला घातलेली शक्ती असते तर भाषिक हा भाषेने जन्माला [illegible]लेला 'शिव' असतो त्यांचा संसार हा नेहमीच सिद्धातांना [illegible]क्कावण्या देत असतो. कारण अनेकदा भाषिक सिद्धांत ही [illegible]या संसाराला आलेली फुलेच असतात. त्यांच्या संसाराचे [illegible]ायप्रॉडक्ट असतात.

•••

[illegible]ाषा ही जशी एक संध असू शकते तशी ती विभागलीही [illegible] शकते. भाषक तिच्याशी तादात्म होऊ शकतो. तसा अलिप्तही [illegible] शकतो. भाषांतरकाराला किमान दोन भाषा तरी येत असतातच

आणि इथूनच त्याच्या आतील भाषिक चक्रव्यूहाची सुरुवात होते. भाषांतरकाराला ज्या भाषेत प्रत्यक्ष संहिता न्यायची असते ती भाषा तिच्या आसपासची संस्कृती एखाद्या चक्रव्यूहासारखी त्याच्या एका अंगात उभी ठाकते. त्याच्या दुसऱ्या अंगात प्रत्यक्ष संहिता असते. त्याला एकाचवेळी चक्रव्यूह तोडायचा असतो आणि त्या चक्रव्यूहापासून गर्भार राहून त्या चक्रव्यूहाला त्यांचीच वाटेल अशी संहिताही द्यायची असते ही एक विलक्षण साधना असते प्रेम आणि युद्ध काम आणि ब्रम्हचर्य ह्यांचा विलक्षण समतोल त्याला ठेवावा लागतो. भाषांतर ही एका अर्थाने तंत्रसाधना असते ती वरकरणी प्रचंड भोगी वाटते पण प्रत्यक्षात ती प्रचंड योग मागते. भाषेविषयीचा आणि भाषांतराविषयीचा कोणताही सिद्धांत त्याला ह्या योग साधनेत कितपत मदत करतो ? ही मदत भाषांतरापूर्वी मिळते की भाषांतर करतानाही ही मदत मिळत राहते ? भाषांतराविषयीचे समाजशास्त्र हे भाषांतर झाल्यानंतरच सुरु होते की ते आधीच सुरु होते ?

एक गोष्ट स्पष्टच आहे भाषांतरासाठी केली गेलेली निवड ही व्यक्तिगत आणि सामाजिक अशी दोन्ही असू शकते. काही वेळा एखाद्या भाषांतरकाराची सामाजिक बांधिलकी ही संहितेची निवड करताना वर्चस्व गाजवू शकते. तर काही वेळा वैयक्तिक हितसंबंध वर्चस्व गाजवू शकतात. वैयक्तिक हितसंबंध सांभाळणारा भाषांतरकार अनेकदा आपल्या कृतीला सामाजिक मुलामाही देऊ शकतो पण हे मुलामे फार काळ टीकत नाहीत आणि काळानुसार भाषांतरकार उघडा पडतो.

सामाजिकता भाषांतरावर कशी प्रभुत्व गाजवते त्याचा उत्तम नमुना म्हणजे भारतात १००० पर्यंत कधीही परभाषी बौद्ध संहिताचे भाषांतर झाले नाही हे वास्तव !आपले बौद्ध भिक्षु चीन तिबेट व जपानमध्ये गेले पण त्यांनी भारतीय भाषेत तिकडील एकही ग्रंथ आणला नाही. वैदिकांनी तर कधीही बौद्ध वाङ्मय मार्गीत भाषांतरित केले नाही. ह्याचे कारण ते वैदिकतेला छेद देणारे होते. म्हणजे संहितेची निवड करतानाच सिद्धांत काम करायला लागतात.

भाषांतर हे मूळ संहिता सार्वजनिक झाल्याचा पुरावा असतो कळत नकळत ते प्रसरणाला मदत करणार असल्याची ती खूण असते मात्र ते नेमके काय करणार हे आता तुमचा अखत्यारीत नसते. ते तिन्ही गोष्टी करु शकते.

प्रसरण हे तीन पद्धतीने होते.

**१.वैश्विकीकरण :** जेव्हा मूळ संहिता तिचे भाषांतर मानवतावादी मूल्यांना वाढवणारी असते तेव्हा ती संहिता तिचे भाषांतर हे वैश्विकी करणाला चालना देते.

**२.जागतिकीकरण :** जेव्हा मूळ संहितेचा कसलाही परिणाम होत नाही ती फक्त अनुभव समृद्ध करते तेव्हा 'ती' व तीचे भाषांतर जागतिकीकरण ह्या प्रगल्भ प्रक्रियेला चालना देते.

**३.विस्तारीकरण :** साम्राज्यवाद, समाजवाद ही सर्व विस्तारीकरणाचीच उदाहरणे असतात. जेव्हा मूळ संहितेचा वापर तिचे भाषांतर आपली संस्कृती आपली ताकद वाढवण्यासाठी होतो तेव्हा ती विस्तारीकरणाला चालना देते.

भाषांतरकाराचा मूळ हेतू काय आहे हे त्याच्या भाषांतरावरून प्रत्येकवेळी स्पष्ट होतेच असे नाही, पण बहुतांशी वेळा ते कळते . भाषांतरकाराच्या चक्रव्यूहातली सर्वात मोठी चक्री दोन संस्कृतीची असते. आयाती भाषांतरकाराला मूळ संहितेतील भाषेची आसपास वावरणाऱ्या संस्कृतीची प्रवासी ओळख असते तो काही त्या संस्कृतीचा सभासद नसतो त्यातच तो जर त्या संस्कृतीतील जुन्या संहितेचे भाषांतर करत असेल तर गोष्ट अधिकच कठीण होते. कारण त्या मूळ संस्कृतीचा भूतकाळ आणि तिचा वर्तमानकाळ ह्यांच्यात पूल बांधणे प्रथम आवश्यक बनते इथे भाषेची कालीक मिती विलक्षण प्रभावी बनते. अनेकदा तर शब्दचिन्हांना फक्त काळच उरतो त्यांच्यामागचे अवकाशीय रुप ते चिन्ह ज्याचं असतं ते नाहीसे झाल्याने नाहीसेच झालेले असते प्राचीन संहितेतला काळ व अवकाश हा त्या अर्थाने कल्पनाप्राप्त असतो. मूळ संहितेची पार्श्वभूमी ही अव्यंगपणे प्राप्त होत नसल्याने भाषांतर हे मूळ संहितेला ठिसूळ करण्याची शक्यता असते.

निर्याती भाषांतरात वरील शक्यता तर असतेच पण इथे भाषांतरकाराला मूळ संहितेची पार्श्वभूमी ही आयातकापेक्षा जास्त परिचयाची असते पण त्याची गोची नेमकी उलटी होते निर्यातकाला ज्या भाषेत भाषांतर घडवून आणायचे असते त्या भाषेच्या संस्कृतीचा परिचय मर्यादित असतो तो तिचा फक्त भेटी (भेटणारा) असतो. त्यामूळे तो ज्या भाषेत भाषांतर करणार असतो तिचा अवकाश व काळ काही मर्यादित हा कल्पना प्राप्तच राहतो आणि ह्यामुळे तो मूळ संहितेला ठिसूळ करण्याची शक्यता असते.

एका अर्थाने आयातकाला मूळ संहितेचे परदेशीपण सतावत असते. आणि तिचे देशीकरण कसे करायचे हा प्रश्न असतो. निर्यातकापुढचा प्रश्न अधिक बिकट होतो म्हणजे असे की आयातकाला मूळ संहिता ठोस आणि ठाशीव भाषेत उपलब्ध असते आणि ज्या भाषेत तिचे चिन्हांतर करायचे असते ती भाषाही निश्चित माहीत असते. निर्यातकाला मात्र मूळ संहिता ठोस भाषेत असली तरी ज्या भाषेत ती भाषांतरीत करायची तिच्याविषयी तो ठाशीव असेलच असे नसते कारण त्याने प्राप्त केलेली परभाषा ही अनेकदा

चिन्हिय असते तिच्यामागचे वैश्विक क्षेत्रिय या विशिय संदर्भ त्याला प्राप्त असतातच असे नाही तो एका अर्थाने कल्पनाप्राप्त भाषेत भाषांतर करत असतो. उदाहरणार्थ चित्रेंच्या सेज तुकाचे भाषांतर नेमक्या कोणत्या इंग्रजीत आहे ? अमेरिकन की आयरीश की ब्रिटीश? की इंग्लीशची कल्पनाप्राप्त मार्गी हीच त्यांची भाषा आहे? की ते Inglish मार्गीत आहे ?

भाषांतरकार हा मूळ संहितेचा भाषिक क्लोन तयार करत असतो अनेकदा मूळ जीवाला व त्याच्या जन्मदात्याला (दातीला) आपल्या क्लोनविषयी काही कळत नाही तशी अवस्था मूळ संहिताकाराची असते दिलीप चित्रेंनी तुकारामाचे काय केले हे तुकारामाला काय कळणार ? विशेषत: अपरिचित भाषेतील भाषांतराबावत मूळ लेखकावर हमखास हा प्रसंग येतो.

भाषांतर हे मूळ संहितेचे प्रसरण असते स्वभावत: कुठलीही गोष्ट प्रसरणाची असोशी बाळगून असते ती त्या प्रसरणाचे केंद्र असते. मूळ संहिता ही भाषांतराच्या केन्द्री असते पण जसे जसे भाषांतर होत जाते तशी तशी मूळ संहिता परीघाकडे वाटचाल करते. भाषांतर हे एका अर्थाने मूळ संहितेचे विकेन्द्रीकरण करत असते लोकशाहीकरण घडवत असते. हळूहळू मूळ संहितेला भाषांतर परिघावर न्हेते आणि स्वत:ला केन्द्रस्थानी आणायला लागते. जेव्हा भाषांतर करुन संपते तेव्हा भाषांतरीत संहिता केन्द्र आणि मूळ संहिता परीघावर गेलेली असते. भाषांतर हे अनुसर्जनातून निर्माण झालेली अनुसंहिता असते आणि ही अनुसंहिता त्या संस्कृतीतील संहिता बनून जाते म्हणजे असे की ईंग्लीश ह्या भारतीय मार्गीत तुकारामाचा अनुवाद Says Tuka म्हणून झाला की Says Tuka ही अनुसंहिता केन्द्रस्थानी येते आणि ती भारतीय Inglish मार्गी संस्कृतीची बनून जाते ह्या प्रक्रियेत तुकारामाची मराठी गाथा परीघावर जाते.

•••

भाषा आणि संस्कृती यांच्यात अद्वैत असते असे सनातन गृहीतक आहे त्यामुळेच भाषांतरे ही संस्कृतीचे मूळ संहितेचे विरुपीकरण करतात असे गृहीत धरण्यात आले आहे ह्याचे मूळ शोधायला गेलो तर आपण पुन्हा वैदिक ब्राम्हणांजवळ पोहचतो संस्कृत ही देववाणी मानल्याने वेदांचे भाषांतर निषिद्ध होते खरेतर वेदांना स्वत:ची रिलीजीयस प्रॉपर्टी समजण्याची ही ब्राम्हणी खेळी होती. सर्वच मालमत्ताधारक स्वत:ची मालमत्ता स्वत:कडे शाबूत ठेवण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळेच गीतेला ज्ञानेश्वरी करणारे ज्ञानेश्वर ब्राम्हणांच्या रोषास बळी पडले. देशी भाषांना मनुष्यवाणी समजणारे भूदेव भाषांतरे कशी अलाऊ करणार ? युरोपमध्येही बायबलची देशी भाषांतरे करणारे जिवंत जाळले गेले. संत जेरोमी इरॅसमस व मार्टीन ल्यूथर ह्यांनाही आपल्या संताप्रमाणेच गोष पत्काराया लागला. युरोपमध्ये तर मूळात ट्रान्सलेशन हा शब्दच मूळात धार्मिकतेतून आला आहे. म्हणजे झाले असे कि-

इ.स.आठव्या शतकानंतर संतांची निर्मिती जवळ जवळ थांबली आणि मग संतांचे अवयव हे त्या पवित्र शक्तीचे प्रतिनिधी बनू लागले. (संत जेम्स सारख्या संताचा तर एक कोपरा Liege मध्ये दुसरा Alsace मध्ये एक हात Reading मध्ये छातीचा तुकडा Pistoia मध्ये, दात Bremen मध्ये आणि उरलेले भाग Santiago de Compostela मध्ये गेले जवळ जवळ नऊ चर्चेसनी जिझसची फोरस्कीन त्यांच्याकडे असल्याचा क्लेम केला. व्हर्जिन मेरीच्या छातीतून स्त्रवलेल्या Vials of mik चे एकोणसत्तर क्लेम आले. सर्वत्र त्यांच्यामागे एकच धार्मिक श्रद्धा होती ती म्हणजे ती अलौकिक पवित्र शक्ती ह्या अंशात पूर्णत: अवतरली आहे. त्या संपूर्ण चे ह्या तुकड्यात झालेल्या अवतीर्णासाठी प्रथम ट्रान्सलेशन हा शब्द आला. तो fero, ferre, fuli आणि latum ह्या लॅटीन क्रियापदांपासून निघाला असे म्हणतात. ह्या क्रियापदांचा अर्थ 'वाहणे' असा होतो असे म्हणतात. (ही माहिती न्यू रायटींग व्हॉल्यूम नंबर नऊ ए एल केनडी व जॉन फाऊल्स संपादित खंडात नॉरेन्स नॉरफोक ह्याने 'वीईंग ट्रान्सलेटेड' (पान क्र.१४१-१५५) ह्या लेखात दिली आहे.)

आपल्याकडे वेद अपौरुषेय मानले गेले होते व ते अपौरुषेय संपूर्ण वेदात अवतरले अशीच धारणा होती. तिकडेही Pope Boniface IX ह्याने संताचे हे ट्रान्सलेशन थांबवण्याचा प्रयत्न केला नंतरच्या पोपांनी बायबलच्या भाषांतरानाच मनाई केली पण ट्रान्सलेशन्स जगभर पसरतच गेली. त्यामुळे रोम हे केन्द्र हळूहळू परीघावर सरकत गेले आपल्याकडे संतांनी वेद व गीता हे असेच परीघावर न्हेत भक्ती केन्द्रस्थानी आणली एका अर्थाने भक्ती ही महाभारतातील गीतांची ट्रान्सलेशन होती तिने मूळ संहिता परीघावर भिरकावल्या आणि भाषांतरे केन्द्रस्थानी आणली भाष्ये केन्द्रस्थानी आणली. ज्ञानेश्वरीचे हे असे केन्द्रस्थानी येणे मराठीच्या पथ्यावर पडले आणि त्यातूनच वारकरी क्रांती जन्मली. तिचा परिणाम असा झाला की आतून मार्गी पिंड असलेल्या वामन पंडीत व मोरोपंत यांनीही त्यांचे अविष्कार देशी भाषेत केले पण तंत्रे मात्र मार्गीचे अनुकरण करणारी ठेवली. मार्गीने त्यांची व महानुभवींची केलेली गोची त्यांना मोकळेपणा देऊ शकली नाही. असा मोकळेपणा येण्यासाठी भाषांतराचे रुपांतर भाष्यात आणि भाष्याचे रुपांतर स्वयंभू भाषेत व्हावे लागते आपल्याकडे ज्ञानेश्वरांनी सुरुवातच

भाषांतराऐवजी भाष्याने केली आणि मग अभंगात स्वयंभू भाषेची सुरुवात केली नामदेव आणि तुकाराम ह्यांनी ह्या सुरुवातीच्या जीवावर स्वयंभू भाषा निर्माण केली आणि त्यांची ही स्वयंभू भाषा हेच मराठीचे प्रधान काव्यशास्त्र बनले. मार्गीच्या आधारे स्वयंभू भाषा निर्माण करणे अशक्य असते असे नाही पण त्यासाठी उच्च कोटीची प्रतिभा लागते आणि व्यक्तिमत्वही मागील संस्कारातून मुक्त असावे लागते. पंडीतांना हे जमले नाही. कदाचित त्यांना संस्कृत ही मार्गी अवगत होती हाच त्यांचा मायनस पॉईंट ठरला आणि संताना मार्गी अवगत नव्हती हाच त्यांचा प्लस पॉईंट ठरला. पुढेही बहिणाबाई चौधरी, ना.धों. महानोर ह्या सारख्यांना मार्गी अवगत नसणे हे पथ्यावर पडले. पंडीत कवींना जे जोखड फेकून देता आले नाही ते जोखड दि.पु. चित्रे, अरुण कोलटकरांनी मात्र प्रयत्नांती फेकले त्यासाठी त्यांना इथल्या देशीशीच नाळ जुळवावी लागली किंवा त्यांची नाळ आधीच जुळली होती. पंडीतांनी संस्कृत ह्या मार्गाचे जोखड जसे वाहिले तसे चित्रे कोलटकर ह्यांनी इंग्रजी ह्या मार्गाचे वाहिले नाही त्यामुळेच ते वाचले आज चित्रे कोलटकर ह्यांच्यात जे काही थोडे फार अस्सल आहे ते त्यांना देशीयतेने पुरवले आहे. चित्रे जेव्हा Says Tuka म्हणत असतात तेव्हा ते कळत नकळत Save Tuka असेच म्हणतात. देशीयतेची मूळ ताकद आणि मार्गीयतेतून प्राप्त झालेली आधुनिकतेची ताकद ह्यामुळेच चित्रे कोलटकर उत्तरआधुनिक कविता सहज निर्माण करु शकले. दिलीप चित्रे ह्यांच्या कवितांतून देशीवाद वजा केला तर आक्टोव्हिया पाझचा निव्वळ सांगडा उरतो इतकी त्यांची कविता स्वयंभूपणासाठी देशीयतेवर अवलंबून आहे. कोलटकर मात्र अस्सल देशी होत गेले आहेत. ह्याउलट बहिणाबाई चौधरी, ना.धों.महानोर ह्यांना ही आधुनिकतेची ताकद प्राप्त न झाल्याने ते उत्तर आधुनिक होऊ शकले नाहीत. नामदेव ढसाळांना मार्क्स व बाबासाहेब आंबेडकरांनी आधुनिकता आणि लिटील मॅगेझीन्सनी व बौद्ध परंपरेने देशीयता पुरवल्याने त्यांनीही उत्तर आधुनिकतेकडे सहज वाटचाल केली. नेते म्हणून आधुनिक आयडीयॉलॉजीचा झेंडा मिरवणारे ढसाळ कवितेत मात्र उत्तरआधुनिक अराजक मिरवत न्हेतात. त्यांच्या कवितेतील हे उत्तरआधुनिक अराजक त्यांना अराजकी राजकीय कृती करण्यास भाग पाडते कवी हा प्रथम कवी असतो आणि नंतर तो राजकीय नेता असतो हे नामदेव ढसाळांबाबत अधिकच तीव्रतेने जाणवते. एका अर्थाने त्यांच्यातील कवीने त्यांच्यातील नेत्याचा पराभव केला आहे. ह्याउलट नारायण सुर्वे मार्क्सवादाने पुरवलेल्या आधुनिकते वरच संतुष्ट राहिले परिणामी त्यांची कविता आटत गेली. बा.सी. मर्ढेकर, विं.दा.करंदीकर आणि नारायण सुर्वे हे एकांगी मार्गीयतेचे बळी आहेत त्यातील सुर्वेंची मार्गीयता ही मार्क्सवादी प्रणाली व हिंदुस्थानी ह्यांनी पोसली होती व तीच्या बेड्या तोडणे त्यांना शक्य झाले नाही. मर्ढेकर करंदीकरांच्या पायातील इंग्रजी बेड्या खणखण आवाज करताना दिसतात. नारायण सुर्वेंच्या पायातील हिंदुस्थानी (उर्दू प्रधान) बेड्या मात्र आवाज करत नाहीत त्यामुळे त्या पटकन कळत नाहीत.

भालचंद्र नेमाडे ह्यांची वाटचाल मात्र वेगळी आहे त्यांनी मार्गीयतेला प्रखर विरोध केला पण आधुनिकता सोडली नाही ती त्यांना इंग्रजीतूनच प्राप्त झाली होती पण इंग्रजीतून आलेल्या मार्गी वसाहतावादाविरुद्ध ते कट्टरपणे उभे राहिले त्यामुळे बीढार जरीला झूल मध्ये आधुनिकतेचे वास्तववादी देशीकरण झालेले दिसते त्यांची कविता ही खऱ्या अर्थाने जिला उत्तरवसाहतवादी म्हणता येईल त्याचे उदाहरण आहे आणि त्यांची हिंदू ही उत्तरवसाहतवादी कादंबरी असेल असा माझा अंदाज आहे. १९५५ नंतर अवतरलेल्या मराठी साहित्याचे मॅपींग करायचे असेल तर ते पुढीलप्रमाणे करावे लागते.

उत्तर विशवाद

| उत्तर आधुनिकवाद | उत्तर वसाहतवाद | उत्तर परिवर्तनवाद | उत्तर सौंदर्यवाद |
|---|---|---|---|
| उदा. | उदा. | उदा. | उदा. |
| अरुण कोलटकर | भालचंद्र नेमाडे | नामदेव ढसाळ | ग्रेस, जी.ए. |
| दि.पु.चित्रे, | चन्द्रकांत पाटील | भुजंग मेश्राम | आरती प्रभू |
| श्याम मनोहर | रंगनाथ पठारे | अरुण काळे | श्रीधर शनवारे |
| | राजन खान | महेंद्र भवरे | गुल्नाव धुरी |
| | | | मल्लिका अमरशेख |
| | | | नरेंद्र बोडके |
| | | | ज्ञानदा, मंगेश काळे |

ह्या सर्वच लेखकावर मार्गी आणि देशी ह्यांच्यातील ताण्या बाण्याचा कमी अधिक ताण पडलेला आहे. यासर्वांच्या वर कमी अधिक प्रमाणात भाषांतराचा प्रभावही दिसतो. या चारही प्रभावांवर उत्तर आधुनिकतेचा प्रचंड प्रभाव असून कधी अस्पष्ट तर कधी उघड (उत्तर आधुनिकवाद व उत्तर आधुनिकता दोन भिन्न गोष्टी मी इथे मानल्या आहेत हे उघड आहे.) ह्याचा अर्थ मार्गी आधुनिकतेचा वारसा खंडीत झाला असा नाही. वसंत आबाजी डहाके, संदानंद रेगे, विलास सारंग वगैरेंनी पुढे तो चालविला. मात्र दिलीप चित्रे, अरुण कोल्हटकरांनी ज्या प्रखरपणे देशीयतेशी आपली नाळ जुळवली तशी त्यांना जुळवणे जमले नाही. आणि हे कवी आधुनिकच राहिले. या आधुनिक कवींचा मंगेश नारायणराव काळे,

अरुण म्हात्रे यासारख्या उत्तर सौंदर्यवादी कवींवर चांगलाच प्रभाव पडला आहे. मराठीत ज्याला आधुनिक म्हणावी अशी कादंबरी फक्त भाऊ पाध्येंनीच लिहिली आहे. जी.ए.कुलकर्णी सारखा आधुनिक कथाकार नंतर उत्तर सौंदर्यवादी बनत गेलेला दिसतो. आणि याला इंग्रजीतून प्राप्त झालेल्या ग्रीक मार्गीयतेचा अतिरेकी प्रभाव जबाबदार आहे. स्त्रीवादी गौरी देशपांडेही पुढे ह्याच मार्गाने उत्तर सौंदर्यवादाला जाऊन मिळतात.

विशवाद

| आधुनिकवाद | देशीवाद | परिवर्तनवाद | वसाहतवाद | नवसौंदर्यवाद |
|---|---|---|---|---|
| बा.सि.मर्ढेकर | साने गुरुजी | किसन बनसोड | माधव मनोहर | पु.शि.रेगे |
| वसंत डहाके | ना.धों.महानोर | नारायण सुर्वे | | सुरेश भट |
| विलास सारंग | ना.घ.देशपांडे | बाबूराव बागूल | | |
| सदानंद रेगे | | | | |

अशी जर आपण विशवादाची मांडणी केली तर उत्तर विशवाद समजून घेणे सोपे जाईल. पु.शि.रेगे, सुरेश भट यांना देशी समजण्याची घोडचूक अनेकदा होते खरी. पण खरे तर त्यांचे नाते अनुक्रमे संस्कृत व हिंदुस्थानी ह्यातून प्राप्त झालेल्या मार्गीयतेशी आहे. हे विदेशी नाहीत हे खरे पण ते देशीही नाहीत ते भारतीयपण मार्गी आहेत. आपणास सर्वांना मार्गीयतेचे आकर्षण असते अगदी नेमाडे ह्यांनाही. हिन्दुस्थानी ह्या मार्गीचे असलेले आकर्षण पहाण्याजोगे आहे. मार्गी एकतर बुरखा घातलेल्या स्त्रीप्रमाणे रहस्यमय तरी असते. किंवा बिकनी घातलेल्या स्त्रीप्रमाणे सेक्सी तरी असते. दोघींही देशीला चालत असतात. हिंदुस्थानी ही मार्गी रहस्यमय तर इंग्रजीही सेक्सी आहे. आणि भारतीय मनाला याचे प्रचंड आकर्षण आहे. नेमाडेंना हिंदुस्थानी ही मार्गी वाटत नाही की काय ? अशी शंका येण्याइतपत ते तिचे फॅन आहेत. प्रश्न आता असा आहे की ख्रिश्चन संतांचे अवयव हे त्या मुळ आदि शक्तीचे भाषांतर होते तसे हे सर्व विश व उत्तर विशप्रवाह युरोपातील कोणत्या शक्तींचे भाषांतर होते ? किती प्रमाणात भाषांतर होते ? यांनी युरोपातील मुळ संहिता किती प्रमाणात परिघावर नेल्या ? जर यातील काहींनी भाषांतरीत व्हायला नकार दिला तर तो कसा दिला ? किती प्रमाणात दिला ? यांनी प्रथम भाष्य होऊन नंतर स्वयंभू भाषा निर्माण केली काय ? की हे पूर्णपणे अस्सल आणि इथलेच होते ? युरोपीयन नोकरशाही, युरोपीयन लोकशाही, युरोपीयन मार्क्सवादासारख्या विचारप्रणाली, युरो अमेरिकन राज्यघटना ह्या जर मूळ संहिता असतील तर त्यांचे भारतीय मितीत कसे भाषांतर (खरे तर चिन्हांतर) झाले त्यांचे कसे भाष्य झाले आणि यातून स्वयंभू भाषा अवतरली का ?

भाषांतराचे आणि संस्कृती संपर्काचे प्रश्न हे असे एकमेकात प्रवेश करून एकमेकात वावरत असतात.

•••

प्रसरणाच्या आजच्या युगात आपण जर पृथ्वीकडे नजर टाकली तर आपणाला चार संवेदनशीलता स्पष्ट दिसतात त्यांना आपण खंडीय संवेदनशीलता म्हणू.

**१.आशियाई संवेदनशीलता :** ही संवेदनशीलता प्रामुख्याने भारत, चीन आणि जपान यांच्यात ठळकपणे काम करतांना दिसते. तिचे वैश्विक केंद्र भारतीय धर्म आहेत. हिंदु, बौद्ध, जैन, शीख ह्या विश्वीय अध्यात्मांनी ती नांगरलेली आहे.

**२.युरोपीय संवेदनशीलता :** ही संवेदनशीलता प्रामुख्याने इस्त्रायल, ग्रीक, रोमन, इराण, अरेबिया वगैरे देशात ठळकपणे वावरते. जिला आपण आज धर्माचे जुडाईक स्कूल म्हणतो व ज्यात ज्यू ख्रिश्चन पार्शी आणि इस्लाम या धर्मांचा समावेश होतो तिने ती नांगरली.

आशियाई आणि युरोपीय ह्या दोन्ही संवेदनशीलता जगात फार ठळकपणे पुढे आल्या आहेत.

**३.अमेरिकी संवेदनशीलता :** ही संवेदनशीलता यु.एस.ए.मुळे प्रचंड प्रभावी झाली असली तरी तिला तिच्या देशियतेचे काय करायचे हा प्रश्न सुटलेला नाही. मार्गी लोकांनी आक्रमण करुन बळकावलेल्या दोन्ही अमेरिका व ऑस्ट्रेलिया खंडात ती अवतरलेली आहे. तिथल्या देशी व पोटी जमातींचा अक्षरश: नायनाट करुन तिथल्या मार्गींनी त्यांचे जीवन अतिशय अवघड बनविलेले आहे. यु.एस.ए.,कॅनडा व ऑस्ट्रेलिया या संस्कृती ह्या एकेकाळी युरोपीय संवेदनशीलतेच्या अक्षरश: भाषांतर होत्या. पण नंतर या भाषांतरांनी प्रथम भाष्य शोधले आणि नंतर स्वयंभू भाषाही घडवून आणली. हे करतांना त्यांनी स्वत:चे देशीकरण घडविले हे खरे पण आपल्या क्षेत्रातील जमाती आणि पोटीची विल्हेवाट लावली. भूतकाळात एका टप्प्यावर भारतीय अध्यात्म व धर्मांनी कसलेही आक्रमण न करता प्रचंड मोठे साम्राज्य आशिया खंडात पसरविले. आणि भारतीय धार्मिकता आणि अध्यात्मिकता सर्वत्र वाढली. त्यानंतर अरेबियातून उगम पावलेल्या इस्लामने क्षेत्रिय आक्रमण करुन ह्या क्षेत्रातील आपले साम्राज्य पसरविले. ह्यानंतर युरोपी विशतेने विशीय आक्रमण करुन त्या त्या क्षेत्राचे रुपांतर आपल्या हव्या तश्या फॅक्टरीत केले. कॉलनी ही युरोपियांची फॅक्टरी होती नंतर राज्य होते. आणि आता यु.एस.ए.ला स्वत:च्या चिन्हीय ताकदीच्या जीवावर सभोवतालच्या संस्कृतीवर आपले वर्चस्व प्रस्थापित करुन त्या त्या देशांचे रुपांतर अमेरिकन स्टुडिओत करावयाचे आहे. त्या त्या क्षेत्रातील राज्य घटनेने अमेरिकन

सॉफ्टवेअर प्रमाणे प्रोग्रॅम तयार करावा असा यु.एस.ए.चा आग्रह आहे. सध्याने मुर्शरफ यांचे पाकिस्तान हे तसे अमेरिकन सॉफ्टवेअर बनले आहे. स्वतः:ची प्रत्यक्ष माणसे पाठविण्यापेक्षा त्या त्या अवकाशात आतील माणसांचेच चिन्हांतर घडवून आणण्यात यु.एस.ए.ला अधिक रस आहे. त्यामुळे कायम स्वत:ची कमीत कमी माणसे मारली जातील याची काळजी यु.एस.ए. घेते हॉलिडवूडचे चित्रपट हे त्या चिन्हांतराची सुरुवात होती. आणि भारताचा चित्रपट वगळता आज जगातील कुठल्याही देशातील चित्रपट सृष्टीला हॉलिवूडचा मुकाबला करता आलेला नाही.

**४.आफ्रिकी संवेदनशीलता :** सध्या सर्वाधिक घोळात सापडलेली ही संवेदनशीलता आहे. अमेरिकन संवेदनशीलतेत मार्गीने पोटी जमाती गिळकृंत करण्यात जे यश मिळविले तसे यश मार्गीला आफ्रिकेत मिळालेले नाही. इथे युरोपिय मार्गीचे आक्रमण झाले पण अमेरिकी संवेदनशिलतेत तिचे जेवढ्या व्यापक प्रमाणात देशीकरण झाले तेवढे इथे झाले नाही उलट इथल्या पोटी भाषांची वाटचाल देशीकडे सुरु झालेली दिसते आणि तिने देशीयतेची चळवळ अत्यंत नेटाने चालवलेली दिसते. ह्या संवेदनशिलतेची सर्वात मोठी समस्या म्हणजे तिला तिची मार्गीच सापडलेली नाही. तिथल्या देशी भाषाही मार्गी बनवण्याइतपत सशक्त झालेल्या नाहीत.

मला स्वत:ला ह्या संवेदनशिलतेचे भविष्यात काय होणार ह्याविषयी प्रचंड उत्सुकता आहे. तिला एक मोठा अडव्हॉनटेज असा आहे की आशियाई युरोपी आणि अमेरिकी संवेदनशिलतेतील महामुर्खपणा टाळून आणि तिथल्या देशींचे विविध पर्यायांचे स्वत:शी योग्य ते संश्लेषण करुन तिला अत्यंत समृद्ध असा पर्याय जगाला देता येईल. आफ्रिका आजही खनीज संपत्तीबाबत समृद्ध आहे. भविष्यात तो संवेदन समृद्धीबाबतही इतरांना मागे टाकून गेला तर मला फारसे आश्चर्य वाटणार नाही. ब्राम्हणी, क्षेत्रिय, विशिय आणि चिन्हीय ह्या टप्प्यानंतर जर पाचवा काही टप्पा मानवी संस्कृतीत आला तर तो आफ्रिकेतून येण्याची शक्यता प्रचंड आहे.

ह्या संवेदनशिलतांची जर भौमितिक आकृती काढायची ठरवली तर त्या पुढीलप्रमाणे येतील.

**१.आशियाई संवेदनशिलता**



एकाच थाळीत सर्व पदार्थ वाढून घ्यावेत तशी जीवनांची सर्व अंगे एका दर्शनात सामावून घेण्याचा इथे प्रयत्न आहे. उलट्या टांगलेल्या अश्वत्थासारखी ही रचना आहे. विज्ञानाच्या क्षेत्रातील अनेक महत्वाचे शोध हे आशियाई संवेदनशिलतेने लावले आहेत. (अगदी पॅराशूट कंपास (ह्याचे श्रेय लिओनार्द द व्हिन्सिने लाटले चीनमध्ये हजार वर्षे त्याआधी ही परंपरा होती) हेलीकॉप्टर भूकंपयंत्रमापक ह्या सारख्या शोधांच्या मूळाशी चीन होता) पण युरोपीयने ह्या क्षेत्रीय शोधाचे विशीय शोधात रुपांतरीत करुन हे श्रेय लाटले. एका अर्थाने मूळ संहिता नाकारुन भाषांतरांना मूळ संहिता म्हणायला लावण्याची ही ऐतिहासिक चलूमी होती. घड्याळ, टेलिस्कोप, बंदूक, रॉकेट, छपाई पुस्तक, नोकरशाही, तोफ, देवीप्रतिबंधक लस, केचअपस कागद, पत्ते, नोटा शोधणाऱ्या चीनने स्वत:भोवती भींत उभी करुन तर भारतीय ब्राम्हणांनी समुद्र पर्यटन बंदी करुन देशीयतेचे टोक गाठले आणि विशियता अनेक शतके आशियाईत गोठली गेली मार्गी आधुनिकतेचे लोकशाहीकरण करायला मार्गीने दिलेला नकार (उदा. घड्याळे फक्त सरदार व राजांकडे होती) हे चीनच्या अध:पतनाचे कारण होते.

**२) युरोपीय संवेदनशिलता :** भोजनात एकावर एक पदार्थ चढवत न्हेण्यासारखी ही रचना आहे. थेसीसचा एक सर्प मग अन्टीथेसीसचा सर्प आणि मग सिंथेसीसचा एक बिंदू अशी ही रचना वहात जाते. अलिकडे सॅम्युअल हटींगटनने जो क्लॅश ऑफ सिवीलाझेशनचा



१९९३ च्या फॉरेन अफेअर्स स्प्रिंग इश्यूत (U.S.A.) मुद्दा मांडलाय तो युरोपीय संवेदनशिलतेतूनच आला आहे. थिसीस ॲन्टीथेसीसचे हे नवे भाषांतर आहे. आशियाई धर्म शर्यत जिंकण्यासाठी स्पर्धेत धावले त्यांनी वेळप्रसंगी पाडापाडी ढकलाढकली केली युरोपीय धर्म मात्र युद्धावरच उतरले आशियाई धर्म हे काहीसे ॲथलेटीक धर्म आहेत युरोपीय मात्र सरळ फुटबॉल सारखेच एकमेकासमोर उभे ठाकतात त्यात प्रतिस्पर्धी संघाबरोबरचा सलोखा आहे पण ह्या खेळाचे रुपांतर युद्धात कधी होईल ते कधीच सांगता येत नाही. आशियाई धर्म आपला ट्रॅक सोडून सहसा धावत नाहीत फुटबॉल मध्ये ट्रॅक नसतोच मैदानाच्या सीमारेषा असतात त्याच ! त्यामुळे युरोपियन लोकांना जेवढी पंचाची गरज भासते तेवढी आशियाई लोकांना वाटत नाही त्यांना लाईन्समन पुरतात. युरोपियन संवेदनशिलता ही जीन्सच्या रचनेला पूरक ठरली

आणि हिस्ट्री आणि जीनीऑलॉजीने तिला व्यसनच लागले.

**३) अमेरिकी संवेदनशिलता :** अमेरिकींची रचना संगणकासारखी आहे त्यांना काही कीज सापडल्यात त्यांना पडदा हा पायऱ्या पायऱ्यांनी वाढतो आहे. पण ह्या पडद्यावरचे चित्र सतत बदलते ठेवण्याचे व्यसन त्यांना जडले आहे डीलीटची कीज तर फारच प्रिय त्यामुळे तिथे काहीही कधीही डीलीट होऊ शकते. देशी जामाती पोटी त्यांनी अशाच सुरुवातीला डीलीट केल्या.

**४) आफ्रिकी संवेदनशिलता :** आफ्रिकेत नुसत्या उभ्या रेषाच दिसतात त्यांचे घनदाट जंगल दिसते त्यातून काय विस्तारणार आहे हे कुणालाच माहीत नाही. त्यांचा वर्णही घनदाट आहे आणि घनदाटतेसारखे भव्य काहीच नाही.



•••

१९७० पूर्वी युरोपिय संवेदनशिलतेतून १.संरचनावादी २.उत्तरसंरचनावादी अशी भाषेची विश्लेषण करणारी दोन स्कूल्स आली ही विश्लेषणे विशिय विश्लेषणेच होती पण त्यांनी १९७० नंतर आकार घेतलेल्या उत्तर आधुनिकतेला जो चिन्हीय पाया आवश्यक होता तो पुरवला त्यातून युरोपमध्ये प्रचंड गोंधळ माजला आणि इंग्रजी मार्गीने हा गोंधळ भारतात भाषांतरीत केला हा गोंधळ नेमका काय होता ?

युरोप हा काही चिन्हीय संवेदनशिलतेचा नेता नव्हता हे नेतृत्व होते. अमेरिकी संवेदनशिलतेकडे ! ती चिन्हीय यंत्रणेला त्यावेळी जन्म घालत होती पण मूळात ह्या यंत्रणेचा तात्विक पाया त्यांच्याकडे पिअर्स असूनही त्यांना सापडत नव्हता आल्वीन टॉफलरने तिसऱ्या वेवची संकल्पना डेवलप केली पण ती शेवटी प्रॉडक्शन बेस्ड होती. म्हणजे अमेरिकी संवेदनशिलतेला चिन्हीय यंत्रणा निर्माण करता येऊनही पूर्ण दार्शनिक अविष्कार जमत नव्हता (अर्थात पीटर ड्रकर वगैरे प्रयत्न करत होते) ह्याचवेळी युरोपमध्ये आधुनिकता आनके द्यायला लागली होती. साम्राज्याबरोबर महारचनाही कोसळल्या आणि महायुद्धाचा साईड इफेक्ट ही ओसरायला लागून अस्तित्व वादाचा प्रभाव ओसरला त्यातूनच उत्तर आधुनिक तत्वज्ञानाचा जन्म झाला पुढे जेव्हा अमेरिकेत राहून आलेल्या जीन ब्रॉदीलॉर्द सारख्यांना अमेरिकन चिन्हयंत्रणेचा प्रभाव उमगायला लागला (उदाहरणार्थ : डिस्ने लँडवरून ब्रॉदीलार्दला हायपर रिअेलिटीचा सुचलेला विचार) तेव्हा त्यांनी त्या चिन्ह यंत्रणेची आणि संरचनावादी उत्तरसंरचनावादी भाषिक विश्लेषणाची सांगड घालून नवे उत्तर आधुनिक तत्वज्ञान जन्माला घातले म्हणजेच आपण जर उत्तर आधुनिक युरोपीय संवेदनशिलतेचा अभ्यास केला तर आपणाला

१. विशिय उत्तरआधुनिकता किंवा प्रतिसृष्टीय उत्तरआधुनिकता उदा.ल्योतीर
२. चिन्हीय उत्तरआधुनिकता किंवा चिन्हसृष्टीय उत्तर आधुनिकता उदा.बॉद्रीलार्द

(ही अमेरिकी चिन्हीय संवेदनशिलतेची युरोपीय भाष्य होती) असे ठळक दोन प्रवाह दिसतात. खुद्द युरोपियन लोकानांही ह्या गोष्टी नीट कळलेत असं दिसत नाही पण त्यांचा अतिशय वाईट परिणाम चिन्हसृष्टीय उत्तरआधुनिकतेवर झाला तीने महारचनेचा अस्त, सबजेक्टचा अस्त, इतिहासाचा अस्त, विचारप्रणालीचा अस्त अशा अनेक विशिय उत्तर आधुनिक खोडी आत्मसात केल्या एका अर्थाने आधुनिकतेतच निगेटीवली पाय अडकण्याचा हा प्रकार होता. आधुनिकतेला सेन्ड ऑफ देताना आधुनिकतेचे स्कूल सोडताना चिन्हसृष्टीय कॉलेजमध्ये मात्र नीट प्रवेश न घेतल्याने ही उत्तरआधुनिकता म्हणजे तात्विक खेळ खेळण्यासाठी घेतलेली सुटी होती हे तत्वज्ञान मनमुराद तात्विक खेळ खेळले. मी १९९० पासून जी उत्तरआधुनिकतेविरुद्ध भूमिका घेतली होती त्याचे कारण युरोपीय चिन्हसृष्टीय संवेदनशिलतेने केलेली चूक आपण आशियाईनी तरी करु नये असे मला वाटत होते पण दुर्दैवाने मी ह्या काळात एकटा होतो.

२००० नंतर तर मराठीत ही चिन्हीय उत्तरआधुनिकता तीव्र होत गेली विशेषत: मनोज जोशी आणि नंतर हेमंत दिवटे, नितीन कुलकर्णीसारखे लोक उघड उघड उत्तर आधुनिकतेला जाऊन मिळाले. चौथ्या नवतेला मिळालेले हे नवमध्यमवर्गीय वळण हे युरोपीय चिन्हसृष्टीय उत्तरआधुनिकतेचे एका अर्थाने भाषांतरच आहे. कदाचित ह्या तिन्ही कवीचे उच्चमध्यमवर्गीय असणे त्यांना

हे वळण घेण्यास भाग पाडत असेल. अर्थात चौथी नवता ही काही माझी मक्तेदारी नाहीन ती एक खुली अवस्था आहे ते एक खुले दर्शन आहे जे कुणीही कसेही बनवू शकतो. त्यामुळे वरील कवींनी चिन्हीय उत्तरआधुनिकता जोपासली तर तीही चौथी नवतान आहे.

मात्र १९८० नंतर जगभर पसरत गेलेली चिन्हयंत्रणा त्यातून मानवी जीवनाला लागलेले वळण टीपण्याची ताकद ना युरोपीय उत्तरआधुनिकतेत आहे ना अमेरिकन थर्ड वेव सारख्या थेरीत आहे मूळातन ते टीपण्यासाठी एका समग्र दर्शनाची गरज आहे चौथी नवता हा त्या दिशेने चाललेला आटापिटा आहे. युरोपीय आणि अमेरिकी संवेदनशीलतेचे भाषांतर होण्याचे नाकारायचे आणि त्याचवेळी विश्व, सृष्टी, प्रतिसृष्टी आणि चिन्हसृष्टी ह्यांना मार्गी, देशी, पोटी, जमाती ह्यांचे सम्यक अवधान बाळगत सामोरे जायाचे असा तिचा अजेंडा आहे. एकदा वैचारिक कृती सिद्ध झाली की मग राजकीय, सामाजिक कृत्येही शक्य होतील असा तिचा अदम्य विश्वास आहे. फक्त भाषांतरांनी संस्कृती घडवू नये तर संस्कृतीने ही भाषांतरे घडवावी असा तिचा आग्रह आहे.

ह्या चारही जागतिक संवेदनशिलतेत आपणाला दोन प्रवाह ठळक दिसतात ते आपण पुढीलप्रमाणे मांडू शकतो.




युरोपीयमध्ये युरो व युरोशियी इस्त्रायल आणि इराक, इराण मोझेसच्या काळापासून लढतायत पुढे हीच लढाई क्रूसेडमध्ये कनवर्ट झाली आणि आता पुन्हा इस्त्रायल पॅलेस्टाईनमध्ये तिचे रुपांतर झाले आहे. यु.एस.ए. ने इस्त्रायलला दिलेल्या सततच्या मदतीमुळे पुढे यु.एस.ए. विरुद्ध इस्लाम असे काहीसे चित्र पुढे आलेले दिसते. यु.एस.ए. वर युरोपिय मार्गी वारशाचा प्रचंड प्रभाव असल्याने त्यांना इस्त्रायल पॅलेस्टाईन संघर्ष चटकन कळतो पण आशियामधला भारत पाक संघर्ष मात्र कळत नाही. त्यातच पाकिस्तान इस्लामी असल्याने आणि इस्लाम हा अंतिमत: ज्युडाईक युरोपी संवेदनशिलतेचा बायप्रॉडक्ट असल्याने त्यांना पाकिस्तान बरोबर डील करणे सोपे जाणे साहजिक आहे. यु.एस.ए. व्हिएतनाममध्ये हारले आणि चीन भारताबाबत गोंधळलेले आहे ह्याचे कारण आशियाई संवेदनशिलतेला कसे हाताळायचे हे त्यांना कधीही कळलेले नाही. दुसऱ्या महायुद्धात जपान वर अणुबॉम्ब टाकून आपल्या अज्ञानातून आलेल्या हिंसक हाताळणीचे प्रात्यक्षिक यु.एस.ए.ने दाखवलं आहे. व्हिएतनाम मध्ये हा पर्याय नव्हता परिणामी पराभव झाला. अमेरिकेने जपानवर टाकलेले अणुबॉम्ब आणि ओसामा बिन लादेनने ट्वीन टॉवर्समध्ये घुसवलेली विमाने एकाच संवेदनशिलतेचे दोन पैलू आहेत. अमेरिका आणि इस्लाम दोन्हीकडे आशियाई संवेदनशिलतेची भाषांतरे फारशी उपलब्ध नाहीत आणि जी आहेत ती वाचण्याची तसदी हे लोक घेत नाहीत. आशियाईंनी युरोपियता जेवढी समजून घेतली युरो अमेरिकीने आशियाई तेवढी समजून घेतलेली नाही. आफ्रिकेचा आशिया-परिचय हा प्रामुख्याने महात्मा गांधींच्यावर अवलंबून आहे भविष्यात त्यांना कधी ना कधी महम्मद पैगंबर आणि म.गांधी ह्यातून एकाची भाषांतरासाठी निवड करावी लागणार आहे आणि ते कुणाची निवड करतात त्यावर आफ्रिकेचे व पर्यायाने जगाचे भवितव्य अवलंबून आहे. हे दोघेही राजकीय संत होते आणि दोघांनीही जमाती पोटी आणि देशी ह्यांना एकत्र जमवून अध्यात्मिक आशयाची राजकीयता निर्माण केली फरक होता तो मार्गातच मोहम्मदने तलवार उचलली तो राजा झाला तर गांधींनी सत्याग्रह, मोर्चा ह्यांचा वापर केला पण राजा होणे नाकारले ते चाणक्यच राहिले परिणामी इस्लाम ही एक बंदिस्त व्यवस्था झाली तर गांधीवाद ही एक खुली व्यवस्था राहिली आहे. आफ्रिकेला भाषांतराची गरज आहे (खरेतर ती सर्वांनाच असते) पण भाषांतराएवढीच भाष्यांचीही गरज आहे. भाष्यात मूळ संहिता ही जितकी महत्वाची असते तितक्याच भाषांतरकाराच्या तळटीपा आणि पुरवण्याही महत्वाच्या असतात ह्या तळटीपा व पुरवण्याच नंतर मूळ संहितेपासून भाषेला दूर न्हेतात व स्वतंत्र भाषा निर्माण करायला मदत करतात. बरटॉन्ड रसेल ह्यांनी हिस्ट्री ऑफ वेस्टन फिलॉसॉफी ह्या ग्रंथात पहिल्याच भागात पाश्चात्य तत्वज्ञान म्हणजे

प्लेटो आणि ॲरिस्टाटल ह्यांना जोडलेल्या तळटीपा आहेत असं म्हटलं होतं त्यात प्लेटो ॲरिस्टॉटल ह्यांच्या मूळ संहितावरची भाष्ये म्हणजे युरोपियन तत्वज्ञाने आहेत असंच ध्वनीत होतं फक्त पुरवण्यांनी त्यांना सतावलं नसावं म्हणून तळटीपावर त्यांनी समाधान मानलं असावं. पुरवण्याचा गंभीर विचार पुढे जॅक देरीदाने केला पण भाष्यापर्यंत पोहचणे त्याला शक्यच नव्हते भाषांबाबत तो शून्यवादी आहे त्यामुळे भाषांतरासारख्या द्वैती प्रक्रियेला सामोरे जाणे त्याला कठीण जात असते. भाषांतर हे मितीकाचे देशीकरण वा परदेशीकरण घडवत असते आणि हे घडताना सबजेक्टचा मृत्यू होणे तर दूर उलट भाषांतरकारात दोन दोन सब्जेक्टचा जन्म होत असतो ह्याबाबतीत दिलीप चित्रे हे सेज तुकांच्या ३०२ व ३०३ पानावर जे म्हणतात (SONTHEIMER EDITION) ते वाचण्याजोगे आहे.

*When I Write in Marathi there is a circle around me which only other Marathi speakers may enter, and when I write in English, I am in another circle, the circle enclosing the spirit of English speaking people. Since the circles can not intersect, my being in each one of them is independent and innocent of the other.*

*This is complicated enough. But my fate is much worse. because I translate from Marathi into English & from English into Marathi though either is an equally impossible activity. For my two linguistic selves can not speak to one another, or if they do they can not understand each other.*

आत्म्यांचे हे अनेकत्व देशीयता शाबूत ठेवू शकते इथे एक आत्मा मार्गीयतेचे महत्व ओळखतो तर दुसरा देशीयतेची आवश्यकता जोखतो त्यामुळेच भाषांतरातून भाष्ये शक्य होतात आणि ह्या भाष्यातूनच पुढे स्वयंभू भाषा अवतरते.

केवळ आफ्रिकीच नव्हे तर आशियी व अमेरिकी संवेदनशिलता हे जेवढ्या लवकर ओळखतील तेवढ्या लवकर जगाचे कल्याण होईल अन्यथा देशीयतेतून दहशतवाद आणि मार्गीयतेतून प्रचंड शोषण जन्मणे अटळ आहे.

•••

भाषांतरकार जेव्हा भाषांतर करतो तेव्हा तो मूळ संहितेतील अनुभवाचे दुसऱ्या भाषेत सृजन करत असतो. मूळ लेखक अनुभवाचे जेव्हा मूळ भाषेत सृजन करत असतो तेव्हा तो नऊ तत्वे काहीशी एकसंघपणे जन्माला घालत असतो. भाषांतरकारालाही त्यातील अठ तत्वांना नवव्या तत्वात म्हणजे चित्तात्मक, आनंदात्मक, शिवात्मक, शाक्त, क्रियात्मक, अवकाशात्मक कालात्मक आणि स्थितीय तत्वांना सतात्मक तत्वात जन्म द्यायचा असतो ही एका अर्थाने सेकंड हॅंड डिलीवरी असते. मूळ लेखकाला ही तत्वे गतिशील असतात भाषांतरकाराला मात्र ती काहीशी स्थिर असतात एका अर्थाने भाषांतर हे सृजनशील उत्पादनच असते. मात्र ते करताना त्याला प्रतिभाशक्ती वापराची लागते. कल्पनेचा सहाय्याने ही आठही तत्वे नवव्या तत्वात कशी वावरतील ते बघावे लागते. एका अर्थाने मूळ संहिताकार हा शेती करून कापसाचे पीक काढतो आणि त्यापासून कापड तयार करतो भाषांतरकार तेच कापड वापरुन आपला कापूस व नंतर कापड तयार करतो. दोघांकडेही कापड तयार करण्याची प्रतिभा लागते मूळ लेखकाजवळ कापसाचे पीक काढण्याची प्रतिभा असते. भाषांतरकाराजवळ ती असायलाच हवी अशी अट नसते मात्र ज्या कापसापासून कापड बनले आहे त्या कापडाचा पुन्हा कापूस करून त्या कापसाचे रुपांतर पुन्हा कपड्यात करण्याची प्रतिभा त्याच्याजवळ लागते मूळ लेखकाजवळ ही अनुप्रतिभा असायलाच हवी असे नाही. भाषांतरकाराजवळ ही अनुप्रतिभा असायलाच लागते. आपल्याकडे अनेक भित्तीचित्रकार वा विशेषत: अभिनेते हे अनुप्रतिभावंत असतात ही अनुप्रतिभा नसेल तर अभिनय करणे शक्य नाही. अभिनय व दिग्दर्शन हे एका अर्थाने नाटककार व चित्रपटलेखक ह्यांनी लिहिलेल्या मूळ संहितेचे भाषांतर करणेच असते. मूळ संहिता चांगली नसेल तर तुम्ही कितीही मोठे अनुप्रतिभावंत असा तुमची फिल्म नाटक वा अभिनय दुय्यम दर्जाचेच राहते. अर्थात हे पटणे वा पटवून घेणे अनेकांना शक्य होत नाही. कारण सद्याचा काळ हा अनुसर्जनाचा काळ आहे भाषांतराचा काळ आहे त्यामुळेच चित्रपट अभिनेते, नेते, रिमीक्स करणारे, दिग्दर्शक ह्यांना फालतूचे अकारण महत्व प्राप्त झाले आहे आणि लेखक, विचारवंत, संगीतकार, नाट्यचित्रपटलेखक ह्या मूळ संहिताकारांना दुय्यम महत्व प्राप्त झाले आहे. मिडीयातील थर्ड रेट मिडीओकर संपादक व पत्रकारांचा ह्या अध:पतनात सिंहाचा वाटा आहे. मूळ संहितेपेक्षा भाषांतरे जास्त आवाज करायला लागली की संस्कृतीचा आवाज बसायला सुरुवात होते. रिमिक्सर्सनी व त्यांच्या रिमिक्सनी ह्याचा प्रत्यय द्यायला सुरुवात केली आहे पण त्यावरुन आपणाला शहाणपण येईलच असे नाही अनुप्रतिभा अनुसर्जन कशी करते ते आपणास पुढीलप्रमाणे मांडता येईल.

| |
|---|
| **मूळ प्रत्यक्ष वा अनुमानात्मक वा चिन्हात्मक अनुभव (प्रत्यक्ष वा कल्पनाप्राप्त)** |
| **+** |
| **मूळ भाषकाची आत्मसृष्टी** |

|




भाषेच्या सतात्मक स्थित्या आपण तपासायला गेलो तर खालील स्थित्या भेटतात (बहुवचनी स्थिती मी मुद्दामच टाळतोय)

**सौष्ठव भाषा :** ही भाषा गुप्त असते आणि तरीही तिची तलाश चालूच असते हिला विश्वभाषा (Universal Language) असेही म्हणता येते ती तयार करण्याचे प्रयत्न चालू असतात. उदा.गणित वा भूमिती किंवा निऑम चॉम्स्कीचे युनिवर्सल ग्रामर.

**अंग भाषा :** ही सूप्त असते पण जाणवत असते व्याकरण म्हणजे अंगभाषाच होय.

**शरीर भाषा :** ही भाषेची प्रकट स्थिती भाषा प्रत्यक्ष ह्या स्थितीत संवेदते आणि प्रकट होते.

**देह भाषा :** इथे भाषक हा भाषेविषयी जागृत असतो त्यामुळे भाषा इथे नुस्ती प्रकट होत नाही तर जागरुकतेने प्रकट होते.

**काया भाषा :** इथे भाषा नुसती जागृत होऊन थांबत नाही तर ती उन्नत स्थितीत पोहचते उदा.कवितेची भाषा ही व्यवहारी भाषेची उन्नत स्थिती म्हणजे हनुमान उडी असते.

**चैतन्य भाषा :** इथे 'भाषिक' 'मुक्त' झालेला 'बुद्ध' झालेला असतो त्यामुळे इथे तो जो भाषा बोलतो ती मी ची नसते आत्म्याची नसते सब्जेक्टची नसते. एक शून्य वा एक पूर्ण त्याच्या माध्यमातून जणू बोलत असते. त्या शून्याचे त्या पूर्णाचे चैतन्य इथे भाषेत आपो आपच सळसळताना आढळते.

भाषेच्या ह्या स्थित्या अनेक वावरांत वावरत असतात ही वावरे पुढील प्रमाणे भाषेतच असतात.

**विश्वीय :** इथे स्थित्या संपूर्ण विश्वातील भाषेत वावरत असतात.

**क्षेत्रीय :** इथे वावर त्या त्या प्रदेशात असतो.

**विशेष :** इथे भाषिक स्थित्या एखाद्या विशेष आकृतीबंधात वावरत असतात. उदा.कविता ह्या विशेष भाषिक आकृतीबंधात होणारा भाषिक स्थित्यांचा वावर.

**आत्म :** इथे सर्व भाषिक स्थित्या ह्या मितीकाच्या आत्मसृष्टीत वावरत असतात.

कुठलीही संहिता ही एकस्थितीय असते किंवा बहुस्थितीय असते तसेच एकवावरी असते किंवा बहुवावरी असते. तुकारामाची आनंदाचे डोही आनंद तरंग ही एकस्थितीय म्हणजे चैतन्यभाषी आहे पण नेमाडे ह्यांची कोसला ही बहुस्थितीय आहे. खरेतर एकस्थितीयमध्येही सौष्ठव, अंग, शरीर ह्या स्थित्या वावरत असतातच पण जाणवते प्रामुख्याने ती कुठली तरी एक स्थितीच. बहुस्थितीय संहितात मात्र भाषिक ताण आणि तणाव प्रचंड वाढतो ती बहुवावरी असेल तर त्यात अधिकच भर पडते. संहितातील भाषा स्थित्या आणि वावर अचुक ओळखणे आणि त्या भाषांतरीत करणे हे कौशल्याचे आणि प्रतिभेचे काम असते. विशेषतः चैतन्यभाषा असेल तर हे काम अधिकच कठीण होते जेव्हा भाषांतर करायचे असेल तेव्हा विशेष भाषांचे वेगळेच अवधान ठेवावे लागते म्हणजे मराठी काव्यभाषा आणि इंग्रजी काव्यभाषा ह्या दोन्हीही विशेष भाषा असतात तरीही मराठी कविता इंग्रजीत भाषांतरीत करताना दोन्ही भाषिक वारसांचा प्रभाव व दबाव पडतच असतो दोन्ही भाषेतील वृत्ते वेगवेगळी असतात म्हणजे अभंगासारखे

इंग्रजीत काही नसते तेव्हा त्या अभंगाचा विशेष भाषिक साज इंग्रजीला चढवावा लागतो. इंग्रजीत अनुप्रतिभेच्या सहाय्याने तो निर्माण करावा लागतो. ('प्रतिभा' ही शक्तीची मुक्त स्थिती असते अनुप्रतिभा ही इच्छा व प्रतिभा ह्यांचे व्यमिश्र रूप असते)

ही संहितेची भाषा निर्माण करताना भाषांतरकाराला मूळ संहिताकाराचा एक आत्मा Subject स्वतःत निर्माण करावा लागतो आणि मग हा जो मूळात्मा आहे त्याने त्याची जी जाणीव बुद्धी विचार, विवेक, प्रज्ञा, सत्य ह्यांनी संहितेत प्रकट केलेले जे चित्तात्मक अंग आहे किंवा स्वभाव भाव, भावना, रस, भक्ति, करुणाशांति ह्यांनी संहितेत प्रकट केलेले जे आनंदात्मक अंग आहे किंवा इतर जी अशीच जी आठ अंगे त्या संहितेत आहेत ती त्याने ह्या भाषांतरीत भाषेत कशी प्रकट केली असती निर्माण केली असती हे कल्पनेने संवेदून ती भाषांतरीत भाषेत निर्माण करावी लागतात म्हणजेच एका अर्थाने स्वतःच्या आत्म्याचा काल्पनिक मृत्यू घडवून आणून आणि दुसऱ्याचा कल्पनाप्राप्त आत्म्याला जन्म देऊन (शिवतत्वाची निर्मिती करुन) त्याला त्या दुसऱ्या भाषेशी रत व्हावे लागते व त्यातून संहितेची निर्मिती करावी लागते.

भाषांतर हे पोस्टमॉडर्न नसते कारण ते भाषांतरकाराच्या आत्म्याचा काल्पनिक मृत्यू घडवून थांबत नाही तर त्याला नवा जन्म देते ते मूळात्मा मूळ संहिता ह्यांचा ही पुनर्जन्म असते दिव्याने वातीला स्पर्शताच त्या वातीतून दिवा निर्माण व्हावा तसे ते निर्माण होते मात्र दुसऱ्या दिव्याच्या निर्मितीनंतर मूळ दिवा कायमचा विझतोच असे नाही तोही जळत राहतो भाषांतरानंतर त्याच्या मूळ आत्माचा झालेला क्षणिक मृत्यू जो त्या संहितेपुरताच होत असतो नाहीसा होतो आणि भाषांतरकार पुन्हा आपली आत्मसृष्टी आपला आत्मा घेऊन असतो म्हणजेच त्याची पोस्टमॉर्डर्न स्थिती ही फक्त काल्पनिक मृत्यूपुरती अस्तित्वात आलेली असते आणि कार्य संपताच ती नाहीशी होते एकविसाव्या शतकात प्रवेश करताना आपण ह्याचे समग्र अवधान बाळगले तर त्याचा आपणाला फायदाच होईल.

भाषांतराविषयी लिहिताना एकंदरच मी काही गोष्टीचे अतिव्याप्तीकरण केले आहे ह्याची मला कल्पना आहे पण संस्कृतीसंपर्काच्या आणि भाषांतराच्या समस्या एकमेकात वावरत असल्यानेच ही अतिव्याप्ती शक्य झाली आहे. हे लक्ष्यात घेतल्यास ह्या संहितेचा व्यंगार्थ ही सहज कळेल.

•••

## संगीतम् ट्रॅव्हल्स्

**जळगांव – पूणे – जळगांव**

१२, लेवा बोर्डिंग कॉम्प्लेक्स
रिंगरोड, जळगाव

●

## निरंजन अर्बन को–ऑप क्रेडीट सोसा.लि., जळगाव

दु.नं.१,एन.के.पॅलेस, १८/अ, शिक्षकवाडी,
जिल्हा बँकेसमोर, रिंगरोड, जळगाव

●

## अमृत प्रकाशन

**खान्देशातील वाङ्मयीन अभिरुची जोपासणारे हक्काचे व्यासपीठ**

एन.के.पॅलेस, १८/अ, शिक्षकवाडी
जिल्हा मध्यवर्ती बँकेसमोर, रिंगरोड, जळगाव

